# प्रफुल्ल पद्माकर

रा० रा० दत्तात्रय बापूराव पद्माकर, (औरंगाबाद)

उर्फ

( कवि 'पद्माकर' यांचा कवितासंग्रह )

प्रस्तावनालेखक

श्री० श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर, एम्. ए., एल्‌एल्. बी.

डेक्कन कॉलेज—पुणें

[illegible] ]   किंमत १ रुपया   [ सन १९२८

प्रकाशक
दत्तात्रय बापूराव पद्माकर
औरंगाबाद





कवि पद्माकर

यांचें

नवीन पुस्तक

# प्रफुल्ल पद्माकर

पाकळी दुसरी

मुद्रक
अनंत सखाराम गोखले
'विजय' प्रेस ५७० शनवार, पुणें.

माझ्या कैलासवासी बंधूस

# समर्पण



प्रफुल्ल-पद्माकर तोय-युक्त
सपद्म-पत्रान्वित भृंग-सक्त
फुला-जलावीण न यांत द्याया-
तुला दुजें, उत्तम-बंधुराया !

-पद्माकर

## श्रीयुत दे० भ० न. चिं. केळकर यांचा अभिप्राय

सा. न. वि. वि. तुमच्या कविता वाचून पाहिल्या. प्रसाद व भाषेचे लालित्य बरेच आढळून आले. पहिल्या बऱ्याच कवितांच्या विषयाची निवड मात्र चांगली वाटली नाही. 'सृष्टि-सुंदरीस','ते प्रेम कोणीकडे', 'मेघाची अकृतज्ञता' इ० कविता आवडल्या. सर्वांत मेघ ही कविता जास्त बरी वाटली. त्यातली हातपाय आवरणाऱ्या कासवाची उपमा अभिनव वाटली. कळावे.

पुणे.
ता. १३-१२-२६.

न. चिं. केळकर

---

## कविवर्य 'अनंत–तनय' यांचा अभिप्राय

काव्य एकंदर रसाळ, प्रसादयुक्त आणि सुबोध आहे. मधून मधून उत्कट प्रतिभा दृष्टीस पडते. आपणही आपल्या मधुर काव्य गायनानें महाराष्ट्र रसिकांना परिचित आहांतच. तेव्हां आपली विशेष ओळख करून देण्याचें कारण नाहीं.

४७० शनिवार, पुणें.
नागपंचमी, शके १८५०.

अनंत–तनय

# पराग-परिमळ

कवित्व असावें निर्मळ । कवित्व असावें सरळ ॥
कवित्व असावें प्रांजळ । अन्वयाचें ॥
कवित्व असावें भक्तिबळें । कवित्व असावें अर्थागळें
कवित्व असावें वेगळें । अहंतेसी ॥
कवित्व असावें कीर्तिवाड । कवित्व असावें रम्य गोड॥
कवित्व असावें जाड । प्रतापविषईं ।
कवित्व असावें सोपें । कवित्व असावें अल्परूप ॥
कवित्व असावें सुलभ । चरणबद्ध ॥
मृदु मंजुळ कोमळ । भव्य अद्‌भुत विशाळ ।
गौल्य माधुर्य रसाळ । भक्तिरसें ॥

—श्रीदासबोध, द. १४३ स. ओव्या ३६–४०.

—"Criticism must be sincere, simple, flexible, ardent, ever widening its knowledge."

—*Matthew Arnold*.

[ **टीका** ही प्रांजळ, सुबोध, व्यापक, सावेश आणि नित्यशः ज्ञानविवर्धक अशी असावी. —**मैथ्यू अर्नोल्ड**.]

**रा॰** पद्माकर यांची प्रथम माहिती मला सुमारें एका तपापूर्वी झाली. त्यावेळीं आम्ही दोघेही आपापल्यापरी आमच्या सध्यांच्या व्यवसायांपेक्षां भिन्न भिन्न—म्हणजे कारच भिन्न !—

व्यवसायांत होतों; आणि त्या वेळीं तरी रा० **पद्माकर हे** सांप्रतच्या स्वरूपांत मला किंवा महाराष्ट्रजनतेला परिचित होतील याची किंवा "**प्रफुल्ल-पद्माकरा**"सारख्या त्यांच्या काव्यगुच्छाला **पराग-परिमळ** लिहिण्याची कामगिरी माझ्याकडे येईल अशी मला मुळींच कल्पना नव्हती !

**गीतक** ( Lyric ) नामक इंग्रजी काव्यप्रकाराचें वैशिष्ट्य सहज रम्य व ललित पद्यरचना, संगीतानुकूल मधुर नादोत्कटता आणि रम्यध्वनिपूर्णतेनें होणारें परिणामकारक पर्यवसान या तीन गुणांत असतें. किंबहुना ज्याप्रमाणें शारीरिक सौंदर्याच्या बाबतींत शरीरसौष्ठव, म्हणजे एकंदर अंगाच्या ठेवणींतील सर्वव्यापी प्रमाणबद्ध मोहकता आणि शरीराच्या उभारणीस व स्थैर्यास आधारभूत अशी रम्य 'समचरण'ता, त्याचप्रमाणें पद्यरचनेंतील अनुक्रमें सर्वव्यापी संगीतानुकूल मधुर नादोत्कटता आणि परिणामकारक पर्यवसान हे दोन गुणच खऱ्या **गीतकाचें** (Lyric) जीवनसर्वस्व होत. सध्यांच्या बऱ्याचशा कवींची **गीतकीय** अथवा Lyrical म्हणून समजली जाणारी रचना स्थूलमानानें आणि केवळ रूढ नामाभिधान म्हणून '**गीतक**' या नांवाखालीं मोडत असली,तरी **गीतकाचे** हे दोन गुण ज्यांच्यांत विशेषत्वानें व खऱ्या रम्यतेनें वास करीत आहेत असे कवि फारच थोडे आढळून येतील असें मला वाटतें. उदाहरणार्थ, कै० दत्तोपंत घाटे ऊर्फ 'दत्त' कवि, रे० टिळक, बालकवि, गोविंदाग्रज व विद्यमान कवींपैकीं रा० आनंदराव टेकाडे, 'अनंत-तनय', तांबे यांचा नामनिर्देश करितों.

स्थूल मानानें एकंदर 'गीतक' या रचना-प्रकाराचें स्वरूप ध्यानांत येण्यास त्यास पारिजातकाचें फूल किंवा कमल यांची उपमा देतां येईल. पारिजातकाच्या फुलाकडे पाहिलें असतां त्याचा लहान, आटपशीर व सुबक आकार, पाकळ्यांचा मर्यादितपणा आणि एकसारखेपणा, मुख्य भागाचा अत्यंत विशुद्ध धवलवर्ण आणि खालच्या टोंकाचा मृदुमोहक शेंदरी रक्तिमा—हे विशेष ठळकपणें ध्यानांत येतात; आणि वाससंबंधानें पहातां, हातांतील किंवा परडींतील फुलांच्या वासापेक्षां दुरून येणाऱ्या त्यांच्या सुवासाच्या लहरींनींच मनास जास्त आल्हाद होतो.

हाच न्याय गीतकास लागू पडतो. जमिनीचा गुण, हवा-पाणी इत्यादि झाडाच्या परिस्थितींतील कमी अधिकपणामुळें, फुलांच्या आकाराचा लहानमोठेपणा यांत प्रसंगविशेषीं कांहीं फरक दृग्गोचर झाला, तरी 'पारिजातक' या जातीच्या दृष्टीनें त्या फुलांच्या आटपशीरपणाच्या निश्चित लक्षणांत फरक होणें शक्य नाहीं. त्याप्रमाणें निरनिराळ्या गीतकांच्या बाबतींत कमीअधिक दीर्घत्वाच्या दृष्टीनें बाह्यात्कारीं कितीही भिन्नता दिसली, तरी खऱ्या गीतकांत तो तो विस्तार आटपशीर या गुणाचाच निदर्शक असल्याचें दिसून येईल.

आकारानंतर पारिजातकाच्या फुलाच्या वैशिष्ट्याचे दुसरे घटक म्हणजे पाकळ्यांचें समप्रमाणत्व व त्यांचा अनन्यसाधारण श्वेतवर्ण. खऱ्या गीतकांतही, त्यांतील विषय व वृत्ति यांच्या सहजोद्भवानुसार, उत्कट तंद्रीच्या भरांत सहजगत्या जुळून येणारी किंवा कसलेल्या रचनाकौशल्याच्या सरावानें सहेतुकपणें साधलेली अशी निर-

निरळ्या कल्पनांच्या मोहक व मर्यादित आंदोलनांची विभागणी—भरतीच्या वेळीं वरखालीं, पुढेंमागें, लहानमोठ्या वगैरे स्वरूपांनीं चालणाऱ्या समुद्रांतील तरंगांच्या मोहक लीलेप्रमाणें—स्पष्ट प्रत्ययास येते आणि रचनेच्या एकंदर ओघांतही सहजार्थबोधक अशी प्रसाद-पूर्णता तरळत असलेली दिसते. अशा तऱ्हेचा सुखद प्रत्यय शेले या आंग्लकवीचीं गीतकें वाचतांना किंवा, गीतकांचा विशिष्ट विचार क्षणभर बाजूला ठेवून म्हणावयाचें झाल्यास, श्रीज्ञानेश्वरांच्या अध्यात्मासारख्या गहन व गंभीर विषयाच्या रम्योज्ज्वल विवेचन-शैलींत अनन्यसाधारण रीतीनें आस्वादावयास सांपडतो.

पाकळ्यांच्या विशुद्ध कांतीप्रमाणें खालच्या देंठाचा कोमल रक्तिमा हाही पारिजातकाचा इतर जातींच्या फुलांहून निराळा विशेष आहे. हा रक्तिमा सर्वव्यापी नसून, केवळ लालभडक तांबडा (जास्वंदीच्या फुलासारखा) किंवा अगदीं फिकट तांबडा—गुलाबी—असाही नसतो. तो मृदुतासूचक मोहक शेंदरी वर्णावर असतो. त्याचप्रमाणें गीतकांचें पर्यवसान केवळ उत्कट विचारप्रधान किंवा अति तीव्र भावनापूर्ण नसून, दोहोंच्या योग्य मिश्रणानें (मधु-आम्ल रुचीच्या आम्रफलाप्रमाणें किंवा सफरचंदाप्रमाणें) स्वादुतर वाटणारें व मनास सुखित करणारें असलें पाहिजे.

शेवटीं, पारिजातकाच्या सुगंधाप्रमाणें गीतकांतही प्रत्यक्ष शब्दरचनेंतून निघणाऱ्या रम्यार्थापेक्षां किंवा प्रस्तुत विषयाच्या अनुरोधानें निघणाऱ्या उद्गारांपेक्षां त्यावरून कवीच्या एकंदर मनोवृत्तीची जी व्यापक कल्पना सहृदय वाचकांस होते, त्याच्या विचारांशीं व कल्पनांशीं तादात्म्य पावण्यांत त्यांना जो अपूर्व आल्हाद-

उल्हास वाटतो, आणि त्या दोहींपेक्षां कवीच्या वृत्तीशीं, अनुभवाशीं व त्यानें प्रकट केलेल्या विचाराशीं स्वतःची वृत्ति, अनुभव व विचार यांची तुलना करून अखेर 'खरा कवि तो कवि', असा स्वतःच्या जाणिवेस विनीत करून त्याच्याचबरोबर मनास सुखित, उल्हसित व आनंदी करणारा जो स्थायी संस्कार मनावर रहातो, तोच, पुष्पांच्या अर्करूप सुगंधाप्रमाणें, **गीतकांचा** खरा आल्हादनिष्कर्ष होय.

**गीतकांस** (Lyrics) पारिजातकाच्या पुष्पाप्रमाणें, **कमलाचीही** उपमा देतां येईल असें जें वर म्हटलें आहे, त्याचा हेतु **गीतकांच्या** स्वरूपांतील दोन मुख्य जातींचेंच दिग्दर्शन करावयाचें आहे. दोन्ही उदाहरणांतील घटकावयवांस सौंदर्य-समीक्षेच्या दृष्टीनें कमीअधिक फरकानें तेंच विवेचन व तीच कसोटी लागू पडते. फक्त **पारिजातकाच्या** फुलांपेक्षां **कमळाच्या** बाबतींत अनेकविध जातिविस्तार, त्यांच्या पाकळयांचा आकार, संख्या व वर्णच्छटा यांची विविधता इत्यादि घटक गुणांपेक्षां **विशालत्व व भव्यता** यांचीच प्रतीति विशेषेंकरून होते.

समारोपादाखल थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, विषय, वृत्ति, विचार व कल्पना यांच्यांतील उदात्तता व भव्यता या गुणांच्या द्वारें जेथें **गीतकांतील** रम्यतेचा आस्वाद घ्यावयास सांपडतो असा **गीतकसमूह 'पद्मजातीय'** होय आणि जेथें विषय, वृत्ति, भावना, कल्पना वगैरेंतील मृदुसूक्ष्मता, ललितकोमलत्व या गुणांच्या द्वारें त्या गीतकांच्या रम्योज्ज्वलतेची आल्हाद-कारक प्रतीति मनावर प्रतिबिंबित होते, तीं **'पारिजातक-वर्णीय'** गीतकें होत. स्थूलमानानें इंग्रजी कवि **वर्ड्स्वर्थ** व

**बायरन्** यांचीं **गीतकें**, त्यांच्यांतील 'उदात्तभव्यता' व आत्मलक्षी भावनाविष्कारासंबंधाची हृदयस्पर्शी व करुणोत्पादक मनःपूर्वकता (Sublimity & Sincerity) या मुख्य गुणांमुळें **पद्मजातीय** म्हणतां येतील, तर **शेक्स्पीअर**, **शेले** व **कीट्स** यांचीं **गीतकें**, प्रायः मृदुसूक्ष्म विवेचकता व वर्णनाची ललितकोमल व स्वयंसंवेद्य हृद्यता' (Sensuousness) या गुणांनीं परिपूर्ण असल्यामुळें तीं, व कमीअधिक मानानें **जयदेवाचें 'गीतगोविंद'**, **श्रीमद्भागवतांतील 'गोपीगीता'**दि गीतें हीं **पारिजातक** वर्गांत बसतील.

**'बृहत्काव्य'** ( Epic ) या रचनाप्रकारांत त्याच्या इतर कोणत्याही लक्षणांपैकीं **विस्तार** हें व अनन्यसाधारण लक्षण मुख्यत्वेंकरून ध्वनित होतें; त्याचप्रमाणें **गीतक** (Lyric) या शब्दानें त्याच्या इतर लक्षणांपेक्षां, विस्ताराच्या उलट, सत्काव्यानुकूल **संक्षिप्तता** हाच त्याचा विशिष्ट व अनन्यसाधारण धर्म सूचित होतो. आपल्या इकडे सर्वसाधारण रूढ असलेल्या **गीत**, **गीतिका** वगैरे शब्दांपेक्षां **गीतक** हा शब्दच नादसाम्याच्या व अर्थद्योतकतेच्या बाबतींत, Lyric याचा सर्वस्वीं अनुरूप पर्यायशब्द आहे.

गद्य अथवा काव्यवाङ्मयाचा आधुनिक पद्धतीनें विचार करितांना, कांहीं नवीन कल्पना सुचविणारे इंग्रजी वगैरे भाषांतील शब्द कित्येकदां आढळतात. त्यांना मराठींत पर्याय शब्द योजणें झाल्यास, त्या त्या कल्पनाविभागाशीं बऱ्याच अंशीं जुळणारे असे पूर्वीच्या मराठी किंवा संस्कृत वाङ्मयांत शब्द आहेत कीं

नाहींत तें नीट शोधकबुद्धीनें पाहिलें पाहिजे व तसे शब्द आढळल्यास तेच जास्त ग्राह्य समजून त्यांचाच प्रचार रूढ केला पाहिजे. याच दृष्टीनें Lyric याला **गीतक** हा प्रतिशब्द आम्हीं योजिला आहे. विवेचनाच्या ओघांत लहानमोठ्या काव्यांचे मुख्य प्रभेद दर्शविणारे शब्द असलेला पुढील श्लोक **श्रीविष्णुपुराणांत** आहे तो असा—'काव्यालापाश्च ये केचिद्**गीतकान्यखिलानि च** । शब्दमूर्तिधरस्यैते **विष्णोरंशा** महात्मनः ॥'

वरील श्लोकावरून स्पष्ट दिसून येईल कीं, **गीतक** हा शब्द स्वतंत्र कल्पनादर्शक व Lyric या शब्दाशीं उत्तम रीतीनें जुळणारा असा आहे.

आतां खुद्द प्रस्तुत कवितासंग्रहाच्या समालोचनात्मक थोडक्यांत कांहीं विवेचन करून, **परिमळाविष्काराचें** कार्य पुरें करितों.

प्रस्तुत संग्रहाच्या ७२ पृष्ठांत एकंदर ४९ कविता समाविष्ट झाल्या असून, त्यांचे ईश्वरोपासना, भक्त व भक्तिमाहात्म्य, 'कवि' व 'रसिक', श्रीकृष्ण व राधा यांच्या प्रेमरहस्यविषयक, सामाजिक, वात्सल्य व दांपत्यविषयक, सद्यःस्थितिविषयक, उपदेशपर व चिंतनपर असें स्थूलमानानें वर्गीकरण करितां येण्यासारखें आहे. तसेंच, सुमारें ३० वर्षांपूर्वी नागपुरस्थ कविमित्रद्वय रा० **नि. ब. भवाळकर** व **अ. सि. साठे** यांनीं प्रसिद्ध केलेल्या **पद्यपद्माकर**-नामक कवितासंग्रहाशीं नामसादृश्याचा घोंटाळा न व्हावा म्हणून रा० **पद्माकर** यांनीं आपल्या कवितासंग्रहास **प्रफुल्ल पद्माकर** असें नांव ठेविलें आहे तें उचितच आहे.

**गीतकांचें खरें स्वारस्य** प्रतीत होण्यास त्यांचें स्वतःसिद्ध

स्वरूप हेंच मुख्यतः कसोटीवजा असतें ही गोष्ट तात्त्विक दृष्ट्या अर्थात् निर्विवादच आहे. तथापि चांगल्या गीतकांचें रसाविष्करण प्रसंगविशेषीं तीं खुद्द कवींकडूनच गायिलीं जाण्याचा सुयोग उपलब्ध झाल्यास तीं अपूर्व आल्हाददायक होतात ही गोष्ट तितकीच यथार्थ आहे. याचा सुखद अनुभव 'आनंदमूर्ति' कविमित्र **आनंदराव टेकाडे** आणि 'सत्काव्य कोकिल' रा० **पद्माकर** यांच्या कवितागायनानें महाराष्ट्रांतील सहृदय काव्यरसिकांस आलेलाच आहे. रा० पद्माकर यांचीं **गीतकें** त्यांच्या गायनाच्या शैलीसारखींच हृदयस्पर्शी व कोमल आहेत. स्पष्ट शब्दोच्चार व अर्थानुरोधी परिणामकारक गानप्रवाह हे रा० **पद्माकर** यांच्या गायनशैलींतील ठोकळ गुण होत. त्यांच्या गीतकांत कल्पनेच्या रम्योज्ज्वल भराऱ्या, वर्णनशैलींतील अपूर्व व अद्भुतरसपूर्ण मोहकता हे गुण नसले, तरी खऱ्या **गीतकांचे** मागें एके ठिकाणीं सांगितलेले जे दोन मुख्य गुण-पद्यरचनेंतील सर्वव्यापी संगीतानुकूल मधुर नादोत्कटता आणि सहज रम्य अंतर्ध्वनिसूचक परिणामकारक पर्यवसान—ते प्रस्तुत संग्रहांतील बहुतेक **गीतकांत** कोणासही स्पष्टपणे दिसून येतील. तसेंच कवितांचे विषय बहुतांशीं नेहमींच्या परिचयाचे, प्रासंगिक किंवा सद्यःस्थितिदर्शक, भक्ति, वात्सल्य, विभूतिपूजा वगैरे सर्वानुभूत भावनांचे असले आणि ते ते विषय वर्णन करण्याची भूमिका व शब्दसामुग्री जरी सर्वसाधारणतः ठरीव स्वरूपाची असली, तरी प्रत्येकांत कवीचें वैशिष्ट्य दर्शविणारी कांहीं तरी आल्हाददायक व अपूर्व रम्यता प्रतीत झाल्यावांचून राहात नाहीं. शिवाय रा० **पद्माकर** यांच्या पद्यरचनेंत त्यांच्या गायनशैलीप्रमाणेंच एकप्रकारची सहजसिद्ध

व अनन्यसाधारण अशी हृदयस्पर्शी कोमलता, व चित्ताकर्षक सौष्ठव आहे, हें वर सांगितलेंच आहे. तसेंच, प्रत्येक **गीतक** संपतें तें 'संपत आलें कां ?' अशी ऊर्मी वाचकाच्या किंवा श्रोत्याच्या मनांत अंधुकपणें देखील उठण्यापूर्वीच, अगदीं सहज गतीनें थबकून स्थिर झाल्याप्रमाणें संपतें. त्यामुळें, वाचलेल्या किंवा ऐकलेल्या गीतकाच्या आनंदास्वादाची प्रसन्नता कायम राहून, पुढील **गीतक** वाचण्याची किंवा ऐकण्याची उत्साहयुक्त जिज्ञासा साहजिक उत्पन्न होते. विषयाचें रम्यत्व, उत्कट व मधुर नादानुकूल शब्दरचना, आल्हाददायक कल्पनासौष्ठव आणि उदात्त अंतर्ध्वनिसूचक, गंभीर परिणामकारक समाप्ति—यांच्या एकत्र संयोगानें अत्यंत हृद्य झालेलीं अशीं **गीतकें** म्हणजे **सृष्टिसुंदरीस** (पृष्ठ १९) व **वसंत-स्वागत** (पृष्ठ २२) हीं होत.

**जलौघ नच परि दिसे पदर जरि ।**
**लहरि झळकती विविधशा परी ॥**

हें जलौघाचें शब्दचित्र किंवा

**ल्यालीं कर्णफुलें तीं कानीं ।**
**डुलती कीं लागतांचि वारा ॥**

यांतील 'निर्झरतटिंच्या' फुलांवरील उत्प्रेक्षा, एकदां वाचली किंवा रा० **पद्माकर** यांच्या तोंडून ऐकली तर त्या ओळी सदैव कानांत व मनांत घुमत राहतात, व प्रत्येक स्मरणाचे वेळीं मनें क्षणैक उल्लसित व सुखित करतात असा पुष्कळांचा स्वानुभव आहे.

**पयोद नभि विहरती डुलुनियां**
**स्वात्मार्पण करिती भुलुनियां**

**जीवन त्यांचें स्वयें हरुनियां**
**मानी ती त्या अमृतधारा ॥**

यांतील रम्य करुणोत्कट विरोध, उपरोधपूर्ण आणि उदात्त अंतर्ध्वनि तर कोणाही विख्यात सत्कवींच्या काव्यांत सहज शोभून जाण्याच्या योग्यतेचा आहे, असें मला प्रांजलपणानें वाटतें.

या **गीतकां**च्या खालोखाल आपापल्या वैशिष्ट्यामुळें विशेष लक्षणीय अशा गीतकांपैकीं पुढील गीतकांचा निर्देश करावासा वाटतो. पृष्ठ २० वरील **निसर्गाची असहकारिता** ही कविता कल्पकतेच्या दृष्टीनें फार मार्मिक असून, तिची रचना शेवटपर्यंत सुंदर साधली आहे. योग्य प्रकारची निरीक्षक दृष्टि योजिल्यास, सद्यःस्थितिदर्शक व व्यावहारिक गोष्टींचेंही रम्य काव्यविषयाच्या रूपानें आविष्करण कसें होऊं शकतें त्याचें प्रस्तुत कविता हें एक चांगलें उदाहरण आहे. पृष्ठ २६ वरील **मेघाची अकृतज्ञता** या अन्योक्तिवजा व उपरोधगर्भ कवितेंतील आवेशयुक्त वर्णन, मेघांच्या व रवीच्या स्थित्यंतरांचें क्रमशः दिग्दर्शन व शेवटचें, बाह्यात्कारीं सौम्य शब्दाचें, म्हणूनच कवीचा सात्त्विक संताप व अत्यंत तीव्र मनःक्षोभ सुचविणारें मेघाच्या निर्भर्त्सनापर पर्यवसान यांमुळें ती कविता फार सरस वठली आहे. '**कवीस**' (पृ.३७) '**कवीस**' (पृष्ठ ३८) **कवींस विनंति** (पृष्ठ ४०) **रसिकांस** (पृष्ठ ४१) या कविता कांहीं अंशीं कविसंकेतवजा असल्या, तरी त्या त्या विषयासंबंधीं रा० **पद्माकर** यांच्या विचारांचें व कल्पनांचें वैशिष्ट्य त्यांत चांगल्या रीतीनें प्रतिबिंबित झालें आहे.

**शिक्षक** व **खरी विश्रांति** या दोन कविता एकेकच श्लोका-

च्या असून एकींतील करुणरसपूर्ण अर्थोत्कटता आणि दुसरींतील दांपत्यप्रेमाच्या सारसर्वस्वाचें केलेलें सहजरम्य व मृदुलालित्यपूर्ण दिग्दर्शन-या गुणांमुळें त्या परिणामकारक झाल्या आहेत. **शिक्षक** या कवितेवरून, वाचकांना **केशवसुतां**च्या 'विद्यार्थ्यांस झोडपणा-ऱ्या शिक्षकास—' या कवितेची साहजिक आठवण झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

कोमल व गोड मोहक शब्दरचना, अंतर्भावनांचें स्वाभाविक आलेखन, ललितोदात्त व सात्त्विक प्रणयाविष्कार इत्यादि गुणसमुच्चयामुळें, **तन्मय राधा** व **कृतार्थ राधा** या कविता विशेष रम्य असून, शिवाय **संतभाग्य भक्तिमार्ग तो ईश कोठें वसे?** इत्यादि कविताही आपापल्यापरी सुंदर साधल्या आहेत. जुन्या सत्कवींच्या परिशीलनाचे सुसंस्कार रा० **पद्माकर** यांच्या काव्यांत दिसत असून चिंतनात्मक, सामाजिक उपदेशपर वगैरे प्रकारच्या त्यांच्या काव्यरचनेवर **केशवसुत** यांच्याच भाषाशैलीची व विचारसरणीची छाप मुख्यत्वेंकरून पडल्याचें दिसून येतें.

थोडक्यांत चटकदार व मार्मिक वर्णन अथवा अर्थोत्कट विचार-प्रदर्शन व सहजगत्या सुंदर साधलेल्या अवतरणयोग्य सुभाषितवजा ओळी यांचीं कांहीं लक्षणीय उदाहरणें खालीं देतों.—

(१) **ठायीं येउनियां मुदें स्वहृदयीं आराधितां ईश्वर**
**बोले आंतुनि मंजु बोल विभु त्या नादें रमे अंतर.**

—पृष्ठ ७

(२) **नाहीं जयापाशीं शुद्ध तें हृदय ।**
**दोषी त्याची माय काय होई ? ॥**

हृदयाची ठेवण त्याचीच मुळींची ।
नव्हे इतराची करणी ती ॥
देणगी देवाची म्हणूं नका तीस ।
कमाई ती खास तयाचीच ॥
... ... ... ... ... ...

अशाही हृदयीं देवा ! तूं राहसी ।
तुझें तूं जाणसी रूप केवीं ॥ —पृष्ठ ८

(३) बालक म्हणजे नव्हे मजा ।
निजकर्तव्यातें उमजा ।

(४) स्वर्गंगेमाजीं विहरे
फसवित घन हा नभीं फिरे ! —पृष्ठ २५

(५) रावाचा जो रंक बनवितो रंकाहि रावापरी
असा हा रावा बडबड करी ! —पृष्ठ ६३

(६) कर्तव्याचा टिळक लावुनी दास मायभूमिचे—
गाजले वकील ते आमुचे ! —पृष्ठ ६४

(७) कशी सुगति लाभणें करुनियां फुका वल्गना?
—पृष्ठ ६९

'अटे' ( 'आटे' या अर्थी ); 'असा सतत वागला, न निजला, इमानी अशा—' ( भरतभूमीच्या तोंडीं स्वतःच्या 'सुपुत्रा'बद्दल—कै० लोकमान्य टिळकांबद्दल—'इमानी' हा शब्द,त्याच्या काव्यहीनतेमुळें व वात्सल्याच्या दृष्टीनें रसापकर्षकतेच्या दोषामुळें अनुचित दिसतो; ) 'पदकें लाथाडि ।' ( 'पदें' या अर्थी ); 'ज्या सुख म्हणती इतरेजन निःशंकें ।' ( 'निःशंकपणा'नें या क्रियाविशेषणाच्या

अर्थानें ); 'पाजळुनि ज्ञानमशाले।' 'दुष्ट गरल जैं विटकें।'; 'दुर्जनविष' 'अनिवारें'।; 'निर्भिड', 'निर्भिडपण' इ० प्रकारचे अशुद्ध, रसापकर्षक किंवा केवळ विशिष्ट प्रांतीय शब्दांचे दोष कांहीं ठिकाणीं दृग्गोचर होतात. तथापि ते अपवादप्राय असून एकंदरीनें भाषा शुद्ध आहे. विशेषतः हल्लींच्या काळीं कवींच्या 'निरंकुशत्वाच्या जन्मसिद्ध हक्का'च्या शिरजोर सबबीवर किंवा 'महाजनो येन गतः स पंथाः।' या न्यायानें, व्याकरणाविषयीं व ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वारादिकांविषयीं आस्था व विवेकशून्य 'बेछूट' 'बेदरकारी' मोठ्या प्रौढीनें दाखविण्याच्या मोहास रा० **पद्माकर** हे बळी पडले नाहींत ही खरोखर मोठ्या संतोषाची गोष्ट होय.

असो. याप्रमाणें, '**प्रफुल्ल पद्माकरां**'तील कांहीं पद्मपरागांचा परिमळ येथें थोडासा विशद करून दाखविला. त्यावरून त्याचें सामान्य स्वरूप वाचकांच्या ध्यानांत येईलच. तथापि पूर्ण सौरभास्वादाचा लाभ होण्यासाठीं त्यांनीं स्वतःच त्यांतील विविध पद्मखंडांचें समग्र आघ्राण करणें जास्त श्रेयस्कर होय, हें निराळें सांगणें नकोच.

आज जवळ जवळ दीड पावणेदोन वर्षेपर्यंत घोळत पडलेलें **पराग-परिमळाचें** कार्य श्रीशनैश्वराच्या दिवशीं—आज शनिवारीं—त्याच्याच कृपाप्रसादानें यथासांग पार पडत आहे याबद्दल त्याचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करावें तितकें थोडेंच !

रा० **पद्माकरांस** तर हा दीर्घ कालावधि प्रत्यक्ष शनीच्या सोडसोतासारखाच सहनशीलतेची परमावधीची कसोटी पाहणारा, अत्यंत मानसिक कष्टप्रद गेला असेल, यांत

शंका नाहीं! तथापि तें सर्व त्यांनीं केवळ वचनबद्धतेचें पावित्र्य राखण्यासाठीं शेवटपर्यंत सहन केलें ही त्यांच्या कवि-हृदयाची खरोखरच चिरस्मरणीय साक्ष होय; व तिचें सकौतुक व साभार स्मरण माझ्या मनांत यावज्जीव कायम राहील हें सांगणें नकोच! हें लहानसेंच पण अवघड दुखण्यासारखें होऊन बसलेलें कार्य एकदांचें तडीस जात आहे, याबद्दल **श्रीशारदादेवीस** मी अनन्यभावें वंदन करितों व तिच्याच कृपेनें रा० **पद्माकर** यांचा **प्रफुल पद्माकर** त्यांस कीर्तिवर्धक व व्यावहारिक फलदायी होवो, अशी सदिच्छा प्रकट करून, **श्रीज्ञानेश्वरांच्या** 'पसाय-दाना'नें **पराग-परिमळाची** परिसमाप्ति करितों.

**दुरितांचें तिमिर जावो।**
**विश्व स्वधर्मसूर्यें पाहो॥**
**जो जें वांछी तो तें लाहो।**
**प्राणिजात॥**

पुणें, शनिवार, फाल्गुन शुद्ध ४,
शके १८४९, ता. २५-२-१९२८.

**श्री. नि. चापेकर**

---

# आत्मनिवेदन

कवि आणि त्याचें काव्य या दोन्ही शब्दांच्या विद्वान् व मार्मिक साहित्यभक्तांनीं आजवर केलेल्या व्याख्या आणि त्यांच्या प्रमुख गुणांचीं लक्षणें, या कसोटीस **प्रफुल्ल पद्माकरां**तील कविता आणि प्रस्तुत कवि कितीसा उतरेल, हें तो समतोल बुद्धीच्या मार्मिक व रसिक वाचकांवर सोंपवीत आहे. प्रस्तुत कवीस त्यानें अंगीकारिलेल्या कीर्तन-व्यवसायास उपयोगी असें जुन्या नव्या सत्कवींचें पद्य-वाङ्मय वाचतांनाच काव्य-स्फूर्ति झाली असून, ती त्याच्या आवडीच्या गायनकलेच्या द्वारें व्यक्त झाली आहे. यावरून काव्य आणि संगीत यांचा निकट संबंध असल्याचें त्याच्या प्रत्यक्ष प्रचीतीस आलें आहे. तथापि काव्यविषयाचें पूर्णत्वानें आकलन करण्याइतकी सहृदयता, सृष्टीचें व्यापक आणि सूक्ष्म निरीक्षण, जगाचा बरावाईट स्वानुभव आणि भाषेवर प्रभुत्व इत्यादि गुणांचें ज्ञान असमाधानकारक असतांही काव्यलेखनाची इच्छा अनावर होण्यास प्रस्तुत कवीचा कांहींसा उताविळपणा व कित्येक विद्वान् साहित्यसेवकांचें व निरनिराळ्या जुन्या नव्या मासिकांच्या संपादकांचें प्रोत्साहनच कारणीभूत झालें आहे.

**प्रफुल्ल पद्माकरां**तील कविता ही निरनिराळ्या साहित्य-विवेचकांच्या दृष्टीनें ध्वनि काव्यें, भाव गीतें, वीणा काव्यें अथवा गीतकें (lyric poetry) या स्वरूपाची ठरेल. यांत हल्लीं बऱ्याच रूढ झालेल्या इंग्रजी (sonnet) स्वनितकाचें अनुकरण म्हणून तीन स्वनितकें दिलीं आहेत. तसेंच यांतील " **चिर सौख्या विलंब**

**कुठला ?"** ही कविता आरंभींची ओळ वाचतांच 'फुलें वेलींचीं' या चालीवर असावी असें वाटतें; परंतु त्याच्या पुढील कडवीं सोळा सोळा मात्रांचीं न योजतां, चौदा चौदा मात्रांचीं—पण गायनानुकूल अशीं वाटल्यावरून ठेवण्याचें धाडस केलें आहे. बाकीच्या कवितांच्या चाली आणि वृत्तें सर्वपरिचितच आहेत.

**प्रफुल्ल पद्माकरां**तील बहुतेक कविता विविधज्ञान विस्तार, मनोरंजन, कीर्तन, प्रबोधन, महाराष्ट्र-साहित्य, तरुण भारत, तत्त्वज्ञान मंदिर, काव्यरत्नावली, रसवंती, मंदार पुष्प-माला, अरुणोदय-माला, इ० मासिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेली आहे. या सर्वांनीं या काव्य-संग्रहांतील कवितांची ओळख यापूर्वींच रसिक वाचकांस करून दिली; याबद्दल प्रस्तुत कवि सदरहु नियतकालिकांचा आभारी आहे.

या काव्यसंग्रहांतील कविता आणि प्रस्तुत कार्य या उभयतांशीं अगदीं आरंभापासून श्री० प्रो० **श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर**, एम्. ए., एल्एल्. बी. यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा आणि आपलेपणाचा संबंध आहे; तो लक्षांत बाळगून त्यांनींच परिश्रमपूर्वक या पुस्तकास प्रस्तावना लिहून दिली; याबद्दल प्रस्तुत कवि त्यांचा कृतज्ञतापूर्वक आभारी आहे.

तसेंच अनेकविध कार्यांच्या व्यापांतूनच वेळ काढून श्री० **न. चिं. केळकर**, यांनीं पुस्तकास अभिप्राय दिला याबद्दल मी त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

श्री० दत्तात्रेय अनंत आपटे ऊर्फ '**अनंत-तनय**' कवि यांचे आभार मानावे तितके थोडेच होतील. पुस्तक छापखान्यांत गेल्या

वेळेपासून प्रुफें तपासणें इ० पुस्तक हातीं पडेपर्यंतची सर्व खटपट त्यांनींच म्हणून केली, इतकेंच नव्हे तर आपला बहुमोल व मार्मिक अभिप्राय पुस्तकास दिला या त्यांच्या श्रमांबद्दल शाब्दिक आभार मानण्यापेक्षां त्यांचें कायमचे ऋणी राहण्यांतच प्रस्तुत कवीस भूषण वाटतें.

" मतिमतांच विलोक्य दरिद्रताम् " या भर्तृहरीच्या उक्तीचा अनुभव आजपर्यंतच्या बहुतेक साहित्य-सेवकांत आल्यावांचून राहिला नाहीं. या नियमास प्रस्तुत कवीही अपवाद नाहीं. तथापि या प्रकाशनाचे कामीं मला भासणारी आर्थिक अडचण वेळींच साहित्य-प्रेमी सद्-गृहस्थांनीं बऱ्याच अंशानें भागविली, त्या सर्वांचा—विशेषतः न्यायमूर्ति श्री० केशवरावसाहेब, हैद्राबाद; श्रीमंत वामन नाईकसाहेब जहागीरदार, हैद्राबाद; श्रीमंत अण्णासाहेब देशपांडे, एलिचपूर व श्री० चौधरी दिगंबरदाससाहेब वकील, औरंगाबाद यांचा मी अत्यंत आभारी आहें.

श्री० अनंत सखाराम ऊर्फ आप्पासाहेब गोखले यांनीं आपल्या लौकिकास साजेल अशा रीतीनें पुस्तकाची अंतर्बाह्य छपाई आणि बाइंडिंग वगैरे चित्ताकर्षक करून दिलें व व्यवहारांत जें सौजन्य दाखविलें त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

शेवटीं ज्या जगन्नियंत्या परमेश्वराच्या कृपेनें हें माझें प्रथम प्रकाशन-कार्य शेवटास गेलें, त्याचे शतशः आभार मानून तूर्त मी सर्वांची रजा घेतों.

द. बा. पद्माकर

---

# विषयानुक्रमणिका

---

# प्रफुल्ल पद्माकर

## मंगलाचरण

देवा! गजानना वंदूनी चरण
आलों मी शरण भक्तिभावें
पूजितां तुजला सर्व कार्यारंभीं
सिद्धि जाण उभी ठाकलेली
सिद्धिबुद्धींचा तूं अससी नायक
देई मज भाक गजानना!
घडो जन्मभर तव गुणगान
म्हणोनी कवन आरंभीलें
तैसी घडो तरी कांहीं जनसेवा
जनीं तूंच देवा! जनार्दन
कोण्या मिषें तरी घडो देवपूजा
वैकुंठींचा राजा कृपा करो
पुरवीं गा! माझी मनींची ही आस
धरिलीसे कांस शूर्पकर्णा!
हालवितां कर्ण तेणें वातें जाण
स्फुरेल कवन ऐसें करीं.

# शारदावंदन

[राग–देस, ताल–दादरा]

मंगलमय चरणयुगुल वंदिं देवि ! भावें
तवयशसरितौघजलीं मज्जन मज व्हावें ध्रु०

चारु धवल वसनान्वित
तनु शोभे भूषित सित
करिं मंजुळ वीणा धृत
त्वद्गुण नित गावे

वाग्विलासिनी अभिनव
सकलकलास्वामिनि तव
रूपीं मोहुनि हरि शिव
ब्रह्मादिक जावे

नाचवि लीलालहरी
जगदाखिलताप हरीं
शाश्वत सौख्या वितरीं
शारदे ! स्वभावें

---

# शारदास्तवन

[ राग--भूप, ताल--झपताल ]

अमरगण नमित तव पदयुगुल शारदे!
हरुनि तद्दुरितभय ज्ञान विज्ञान दे
सरसिजाक्षी कमलवदन बिंबाधरे
श्वेतवसने करीं माळ वीणाकरे
नूपुरध्वानि चरणिं मंजुळ स्वन उठे
शिखी वाहन रुचे ब्रह्मनंदिनि! नटे!!
विमल यश संचरे विश्विं तव जननि गे!
गाति तुज कवि कवनिं ध्याति तव मूर्ति गे!

---

## ईश-प्रशस्ति

अगम्य गुण सर्वही प्रभुवरा! तुझे नान्यथा
सहस्रमुख शेषही श्रमित जाहला वर्णितां;
स्वयें जरि सरस्वती विनटली कथाया कथा
तरी घडति ते वृथा श्रम, न वर्णवे त्वत्कथा!
नगाधिपसुकन्यका चरणपद्म अत्यादरें
सहर्ष रत होउनी चुरित भक्तियुक्तांतरें
असाहि मघवादिकीं सुरगणीं महादेव, ना
समर्थ वदण्या पहा किमपिही सुरम्या गुणां!
हलाहल विषाचिया अमित वेदना जावया
शशी रजनिनाथ जो धरित भाळिं शंभू तया
सुशीत सरिता शिरीं धरुनि कष्ट ना मावळे
उपाय तरि संपले सकल शंकरा वाटले!
अपार गुणसिंधु त्या मथुनि सार जें काढिलें
मनोज्ञ लघु 'राम' हें वदनिं तेधवा सांठलें
सदा रमुनि त्यासवें भयद ती व्यथा नाशिली
अमोल विभु राम ही अमृतवल्लि त्या वाटली.
मिठी सुदृढ मारिली गजपदास नक्रें यदा
त्यजूनि अवघी दया, लव न जीविताशा तदा

प्रफुल्ल कमला तदा कमलजावरा अर्पुनी
वदे नमुनि 'धाव गा! प्रणतसंकटीं'त्या क्षणीं.
अशी करुणशी गिरा परिसतांच वेगें निघे
खलांतक विनायकावरि विराजुनी धाव घे
क्षणांत खल नाशुनी गजवरा तदा मुक्ति दे
खरी सदयता परी सतत ती खला ताप दे!
असंख्य भवसागरीं बुडति जे तुवां तारिले
विलीन दिसती तया सकल संकटीं रक्षिले
तुला विषयकाननीं भ्रमुनि जाण अव्हेरिलें
खरेंच खल ते किती परम दुर्गती पावले

---

# श्रीरामस्तवन

[ चाल—या नव नवल...... ]

हे नवकमलदललोचना! नमना त्वत्पदकमलीं करितों निशिदिनिं
स्वीकरिं सीता-रमणा ध्रु०

नादलुब्ध शिवशंकर स्मरहर
दशमुख-गानें तोषुनि अतितर
पुरवित तन्मनिं वसत हेतु हर
तुष्ट करी असुरांना

तोही ईश्वर प्राशि जें विषा
दग्ध करित तनु, असुखा नाशा—
न्याया, त्वन्नामां जगदीशा!
नाचुनि गाई गाना

नारद तुंबर सुस्वर गीतें
राग तालयुत गाती तूतें
नादब्रह्मचि भरलें वदते
श्रुति-वाणी सर्वांना

---

# " तो ईश कोठें वसे ? "

सौंदर्यातिषयें जगास नटवी तो ईश कोठें वसे ?
आकाशीं विधुच्या तशाच रविच्या तेजीं न मातें दिसे
भानूच्या गतिला नियंत्रित करी वाटे तसा नाचवी
सत्ता ज्यास पळांत विश्व अवघें निर्मी तसें नाशवी
सिंधूच्या लहरी विशाल उठती त्यामाजिं शोधावया.
जातां नाढळला जलांत म्हणुनी उत्साह गेला लया
रत्नें सांपडलीं अनंतपरिचीं मोत्यें तशीं सोज्ज्वल
ज्यांची चाड न, ऊत येइ भुलवी मन्नेत्र जे निर्मल
झाडें पालवलीं लता बहरल्या तद्गंधभारें नटे
विश्वीं एक वसंतमात्र विलसे आशा समूळा तुटे
ऐकाया असुनी न मी भटकतों गुंजारवा निष्फळ
का गा ! तूं मधुपा ! उगाच छळिसी घालूं नको गोंधळ
ठायीं येउनियां मुदें स्वहृदयीं आराधितां ईश्वर
बोले आंतुनि मंजु बोल विभु त्या नादें रमे अंतर.

---

# एक हृदय

नाहीं जयापाशीं शुद्ध तें हृदय
दोषी त्याची माय काय होई ?

हृदयाची ठेवण त्याचीच मुळींचीं
नव्हे इतराची करणी ती

देणगी देवाची म्हणूं नका तीस
कमाई ती खास तयाचीच

तयाच्या हृदयीं भुतें नाचताती
करिती तीं माती सर्वस्वाची

तयाचें हृदय जाळील जगाला
लाभ हा तयाला भला वाटे

अशाही हृदयीं देवा ! तूं राहसी
तुझें तूं जाणसी रूप केवीं

---

## " न चले सद्बुद्धि कांहीं तिथें "

होतें जैं प्रतिकूल दैव न चले सद्बुद्धि कांहीं तिथें
केले थोर जरी प्रयत्न अवघे होती वृथा शीण ते
येई प्रत्यय हा सदैव सकलां जाणोनि हें इंगित
सत्काव्यीं कविनें उपाय कथिला धैर्या धरा निश्चित
धैर्यें आजवरी अनेक हरिलीं ज्यांनीं महा संकटें
दुःखाचे गिरि लोटतांहि दिधलीं खालीं शिरें, ते कुठें ?
ठेवोनी पुढतीं सदैव धरिला आदर्शवत् मार्ग तो
गेले जे गिरिराज लंघुनि, तयांमागून मी चालतों.

---

## अवतारकारण

[ चाल–भूपती खरे... ]

आनंदकंद जो नंदन वसुदेवाचा
अवतरुनि भूवरी राखी पथ नीतीचा
ज्या कंस खलानें सुरवृंदातें छळुनी
बंदींत ठेविले अन्यायी नच असुनी
बहुतापरि बोले बोल मर्मभेदाचे
सहन ते करिति सर्वही गरल सर्पाचें
कित्येक विषारी फूत्कारानें मेले
कारागृहिंच्या कटु तापांतुनि ते सुटले
अन्याय यापरी होतां–ऐकिली–
हांक जी शुद्धबुद्धीची–मारिली–
त्या सुरवृंदानें, एकवटुनि नादाचा–
दुमदुमला ध्वनि हो जागा नाथ जगाचा.
तैं गरुडावरुनी धाव घेइ वनमाळी
तात्काळ पातला सुरवृंदाच्या जवळी
पटपटा पडुनि पदिं मस्तक नमविति वेगें
द्या जीवदान आम्हांस अन्य तें नलगे
हीं दीन बालकें तुमचीं ना! हो! देवा!!
मग तुम्हांवांचुनी परामर्श कुणि घ्यावा

जरि घ्यावे प्राणचि ऐसें-वाटतें
तव मनीं तरी निजहस्तें-घेइं ते
हा देह तव पदीं पडतां सद्भाग्याचा-
मानुं तो, परि नको वास पळहि या गृहिंचा !
ही तशीच जनता भारतभूची पाहीं
किति हळहळते तिज अन्नहि पोटा नाहीं !
अति हीनदीनशी फिरते दारोदारीं
तिजविषयीं करुणा काय लोपली सारी ?
किति अन्यायी जरि असली तरि घननीळा !
धड अन्नवस्त्रही कां न मिळावें तिजला ?
अन्याय असा तो केला-कोणता
बोल रे ! त्यजूनि अबोला-तत्त्वतां
न मिळे कारण तरि कैवारचि जनतेचा-
घेउनी करीं संहार दुष्ट दैत्यांचा.
या तैशा दुबळ्या गायींचा सांभाळ—
गो-ब्राह्मण-पालक करिती ना भूपाल ?
हें ब्रीद तयाचें विसरे जरि नर-पाल
कां संधि न साधी अशी नीच खल काळ ?
जो लाजवि काळा संहरुनी गायीला
तूं रक्षिलेंस कां सांग अशा अधमाला ?

मग आजचि कां रे ! ऐसें–झांकिलें
तें कमलनयन म्हणुनी कां–मिटियलें

जरि सूर्योदयिं तें विकसे निश्चय त्याचा
तरि निशा संपुनी होय उदय कधिं रविचा ?
बंदींत ठेविलीं कंस कृष्णसर्पानें
वसुदेव-देवकी जी कां अन्यायानें
ते दीन बापुडे लागतात तव पायीं
सर्पानें गिळिलीं बाळें, सहन न होई
जरि आतां करुणा उपजे तुजला कांहीं
फेड तूं करुनि घे प्रभो ! सांग लवलाहीं

प्रार्थितां यापरी देवा–कोपला
निर्धार क्षणीं त्या केला बोलला

" हे माते ! देवकि !! होउनि बालक तुमचा
पाळुनी धरा संहार करिन कंसाचा "
आश्वासुनि यापरि हरि घेई अवतार
प्रत्यक्ष असोनी मातुल, करि संहार
जो राज्यमदानें धुंद मत्त कीं झाला
मिळतांच संधि त्या घाव मस्तकीं केला

आघात विभूचा पूर्वी–नाकळे
चुकवाल पावतां केवीं–ना टळे

मग रंक असो वा रावहि नव खंडांचा
नच भेद त्यापुढें पाड काय इतरांचा

---

# दलार्पण

'कृपाकर' 'कृपानिधी' विबुध सर्वदा वानिती
असें असुनि शोषला तव निधी कसा संप्रती
तृषार्त जन वंदितां तव पदा सुधा अर्पिसी
कसें अनृत मी म्हणूं 'विबुधधीहि होई पिसी'
तुला सतत आठवीं विनतशा हृदें कामदा !
परी वसत कामना पुरविसी तिला ना कदा
सदा धरिसि तूं अढी कवण काजिं गुंतोनियां
व्रता विसरसी कसा पुरविं कामना दातया !
ध्रुवा अढळ अर्पिलें पद तयास मी योग्य ना
परी अचल ठाव दे स्वपदपंकजीं गुंजना.
स्वंय भ्रमर होउनी भ्रमत पाठिं लागोनियां
क्षणांत नव रूप तूं धरुनि मोहिसी कासया ?
क्षणांत अधरीं धरीं मधुर वेणुनादा करीं
गवादि रिझवीं व्रजीं भुलवि गोपगोपी हरी
तुझ्या मुरलिच्या रवा परिसतांच आनंदलें
मला सुखविण्या तुला कवनरूप अर्पी दलें

---

# भक्तिमार्ग

'कालभीति नुरते प्रभुदासा'
भक्तिमार्ग शिकवी पथ ऐसा
सेवितां नच उरे लव शंका
जो क्रमील नर धन्यचि ऐका

जो गुणें सरस थोरहि एक
वानिती विबुध संत अनेक
त्याविणें इतर मार्ग न सोपा
कष्टसाध्य[1] घडवी बहु खेपा

याच देहिं घडणें जरि मोक्ष
आठवा हृदयिं तो कमलाक्ष
साक्ष देइ सकलां प्रभुकीर्ति
भक्तचित्तिं रमते नित मूर्ति

देहमानसधना जरि पायीं-
अर्पितां अभय तो प्रभु देई
तारुनी भवनदींतुनि नेई
वारुनी दुरित दे सुखसोयी

१ क्लेशाधिकतरस्तेषां-

संचलें हरिपदीं सुख सर्व
तें मिळे नर जरी त्यजि गर्व
क्रोध मोह अवघे करि दूर
त्यास देइ विभु तें सुख फार
भाव अंतरिं तया वश ईश
नाशितो सकलही भवपाश
ब्रीदँ रक्षित असे चिरकाल
तज्जनांस न शिवे कलिकाल

---

१ परित्राणाय साधूनां इ०.

## संत-भाग्य

संतांचीं चरितें सुपावन अशीं ज्यांनीं मुखें गाइलीं
तत्कीर्ति श्रवणीं निरंतर मुदें अत्यादरें ऐकिली
अंतर्याम रितें दिसे न बघतां तच्चित्र रेखाटलें
आदर्शापरि हो ! चरित्र धरिलें तद्भाग्य वाटे भलें

संतांची महती वदूं किति जयां ते देवही सेविती
ब्रह्मा विष्णु तसे महेश अवघे ध्यानीं तया लागती
सत्संगा भुलुनी रमा न गणिली धावे पुढें मागुतीं
संतांचे मनिं येइ तें करितसे श्रीविष्णु तैशा रिती

नाथाच्या सदनीं स्वयें निजकरें घाशितसे चंदन
पाणी कावडिनें भरी पडुं दिला ज्यानें मुळीं खंड न
पक्वानें त्यजुनी हरी जनिसवें खाई शिळी भाकरी
तीही देइ न त्यास व्यर्थ, दळुनी घेई पुरी चाकरी

# एकादशी

[ भू-वैकुंठ अशा श्रीरुक्मिणीपांडुरंगांच्या पंढरीक्षेत्रांत नाममहात्म्य आणि एकादशीमहात्म्याकरितांच भूदेवसंतांनीं सर्वस्वावर पाणी सोडिलें. ]

धन्य एकादशी व्रत आचरीतां
पांडुरंग हाता येतो सत्य
आषाढीं कार्तिकीं पंढरीस जाती
भक्त आलिंगिती पांडुरंगा
काय अन्य दिन नाहीं भगवंता
आवडे अनंता एकादशी
सद्भक्तांचा मेळा मिळुनी राऊळा
आळवी कृपाळा याच दिनीं
नामदेव तुका मारुनीयां हांका
वैकुंठनायका जागवीती
हितगुज करी भक्तांशीं श्रीहरि
एकादशी तरी सर्वश्रेष्ठ
देवा आवडावें निजहित व्हावें
व्रत आचरावें एकादशी

---

# चंचला मति

देवा ! दयाळा ! मती चंचळा ही
तुझी देणगी मानवां का असे ?

कां आड यावी तुझ्या प्राप्तिलागीं
भ्रमे स्वैर मार्गी भरे कां पिसें ?

आतां अशी ही किती धाव घेई
कुण्या दुःखगर्तेंत नेई जनां ?

झाली पुरी विस्मृती त्वत्पदाची
सदा आपदा ना गती त्याविना !

---

## सृष्टिसुंदरीस—

[ चाल–मज गमे ऐसा जनक तो ]

मन रमे बघतां ही धरा, सलिलपूर्णा ध्रु०
जलौघ नच्च परि दिसे पदर जरि
लहरि झळकती विविधशा परी
हरितांबरिं कीं सृष्टिसुंदरी
नटली यापरि सुंदर दारा !
जलबिंदू जे तृणांकुरांवरि–
शालु बुट्यांचा हरित रंगि जरि–
शोभवितो, जन हृदयातें हरि
होई बघतां सुख सकल नरां !
निर्झरतटिंच्या पुष्पलतांनीं
आलंकृत जणुं झाली धरणी
ल्याली कर्णफुलें ती कानीं
डुलती कीं लागतांच वारा !
मधुकर उडतां कर्णफुलांवरि
सुखवाया तिज मधुर रव करी
गानें मोहुनि त्याच्या मुखिं भरि
त्यांतिल मकरंदाची धारा !
पयोद नभिं विहरती डुलुनियां
स्वात्मार्पण करिती भुलुनीयां
जीवन त्यांचें स्वयें हरुनियां
मानी ती त्या अमृतधारा !

---

## निसर्गाची असहकारिता

जलदपंक्ती आकाशमार्गि येती
सुजल वर्षुनियां धान्य विपुल देती
असा यत्क्रम हा स्तब्ध त्याहि होतीं
असहकारित्वें मुग्धता वरीती

भूमि झाली तृणधान्यहीन सारी
तळीं निर्झरसरितांस नसे वारी
जीवनाच्या वैभवातें त्यजीती
असहकारित्वें मुग्धता वरीती

रम्य उपवनिं फल-पुष्प-भार नाहीं
गलितदल ती तरुराजि दिसे पाहीं
श्रमें छाया मार्गस्थ जैं पहाती
असहकारित्वें मुग्धता वरीती

वृक्षशाखांची आर्द्रता गळोनी
अहा झाल्या त्या शुष्ककाष्ठ रानीं!
कडाडोनीयां पडति अशा रीती
असहकारित्वें मुग्धता वरीती

भानुकिरणें विकसती कमलपंक्ती
स्वागतातें आदरें सज्ज हो ती
करि न वदना रविकडे आजला ती
असहकारित्वें मुग्धता वरी ती

भ्रमरगुंजनही श्रवणिं तें पडेना
केविं होणें मधु त्यांस जरि मिळेना
स्वैर फिरणें सोडोनि मधुप जाती
असहकारित्वें मुग्धता वरीती

पुष्पवाटी कांतार जरठ झाली
म्हणुनि गात्रीं शिथिलता फार आली
" नको करणें उपकृती यापुढें ती "
असहकारित्वें मुग्धता वरी ती

नद्या सागरसंगमीं शुष्क झाल्या
नाहिं आलिंगन सागरास, गेल्या–
दूर देशीं त्या लागती न हातीं
असहकारित्वें मुग्धता वरीती.

---

# वसंतस्वागत

[ चाल—प्रिये ! पहा रात्रीचा... ]

सुमंगला वनदेवी नटुनि थटुनि
सविनय करि स्वागता ध्रु०

खगगणरव कीं छननन
रुमझुमती पदिं पैंजण
मंद मंद विहरत वन
खुले देवि क्रीडतां !

हरित पीत रजत कृष्ण
घडि घडि बदलीत वसन
झळकति किति विविध वर्ण
नयन दिपति निरखितां !

कंचुकिं नगयुग विलसत
वृक्ष वेलि जणुं गुंफित
स्वकरें वरि, दावि हस्त—
कुशलता प्रिया स्वतां !

विकसित नव-कुसुम-भार
ल्याली अमित प्रकार
मौक्तिकसर, रत्नहार
करिं कंकण शोभिता !

निर्झर झुळझुळ वाहति
कीं माथां केश रुळति
पवनें त्या मिळते गति
   मानिति नच वारितां !
अरुणोदय नच ती सति
मळवट भरि भाळीं, रति
सौंदर्यें लज्जित अति
   लपवि मुख विलोकितां !
आम्रवृक्षराजि नवी
द्वारीं तोरण लावी
रंगवल्लि पथिं रंगवि
   दिसति त्या न सुमलता !
प्रिय वसंतनाथोदय
होइल जाणुनि निश्चय
होवो नच दैव अदय
   त्यास, विनवि ती नता !
स्मरमित्रासह वसंत
अवतरला अवनिं, कांत–
विरहि, सतीसुस्वागत
   स्वीकारिति उभयतां !

वनदेवीसह वसंत
असतां प्रेमें क्रीडत
मदन मित्र तेथ जात
  निरखित त्यां लज्जितां !
स्थिरचर प्रेमें नटलें
वसंतसमयीं दिसलें
धन्य धन्य तें झालें
  सुख निरुपम लाभतां !

---

# मेघ

कृष्णकाय किति विशाल हा
नभिं सरसावे कोण पहा
क्षणीं पसरितो बाहु महा
बघतां बघतां आवरि हा
चरण दीसती
लांब ते किती
तेहि पावती-
क्षणिं विलयातें, नवल असे
घडिघडि दावी पहा कसें !
विशाल उदरीं सांठविलें
काय तरी इतुकें न कळे
आवरुनी अवयव सगळे
वाटें उदरीं सांठविले
कासवाकृति
जणूं गमे ती
कीं स्वैरगती
स्वर्गंगेमाजीं विहरे
फसवित घन हा नभीं फिरे !

---

## मेघाची अकृतज्ञता !

पयोदांचे गण मिळुनि एक जागीं
भ्रमत येतां दाटले नभोभागीं
पाहुनीयां तैं कृष्णवर्ण त्यांचा
सहज मागें लोपला रवि नभींचा

प्रभा भानूची झांकि असा कोणी
वीर जगतीं कधिं ऐकिला न कानीं
एक केतु ग्रह असे तयावीण-
आजि निपजे हा दुष्ट दुजा कोण ?

अचल झाले मेघास साह्यकारी
उभयतांनीं सारिलें तया दूरी
कठिण समयीं कोणी न कुणा वाली
तोचि अनुभव ये रविस तया कालीं !

उदय होतां रवि बालकिरणकांती
प्रथम अचला दे प्रेम दावि चित्तीं
परी शिखरें उभविलीं उंच भारी
धरुनि मेघा शिरिं होय रविस वैरी

रविहि कालीं त्या क्षितिजतलिं बुडाला
तदा घाली धुडगूस मेघमाला
निशी सारी व्यापिली घन-तमानें
नृत्य केलें जलबिंदुनिपातानें

विजयि होतां मेघास हर्ष झाला
विकटहास्यें तैं करुनि गर्जनेला
दांत विचकुनियां प्रभा दावि भारी
तीच जाणा विद्युल्लता तमारी

मेघ बनले यत्करप्रतापानें
तेच झाले कीं प्रबल जलमदानें
दिव्यकांती बघवे न मुळिं रवीची
रीत मेघांची नच कृतज्ञतेची !

---

# धन्य सुमन

[ चाल—चंद्रकांत राजाची....... ]

रविकर तापा साहुनि कुसुमा ! मधु परिमल देसी
इतरां सुखवुनि लाभ काय तो तुला सांग मजसी ?
कर्दमिं कंटकजालीं निपजुनि रूपें भुलवीसी
भ्रमर मधुरवें गुं गुं करितां आलिंगन देसी
रसिक जनांच्या करिं तव पडतां सुंदर मृदु मूर्ति
कोण्या स्थलिं तुज ठेवावें हा विचार मनिं करिती
म्हणती इतर न योग्य स्थल परि युवति-शिरावरतीं
ठेवुनि सुंदरता उभयांची दुणावेल पुरती
योजुनि ऐसें युवति-शिरावरि ठेवुनि तुज कुसुमा !
बघतो रसिक न वदन युवतिचें, पाहे तव सुषमा
चित्त वेधिलें मत्प्रियपतिचें न सहे कुसुमानें
शिरिं तुज धरिलें, योग्य न, याचें हें उलटें देणें
म्हणुनी मत्सरभावें रमणी फेंकुनि तुज देती
शांतपणें तूं सर्व साहसी करितां नच खंती
कोण तुझी ही सहनशीलता परोपकार-रता
सुमना ! दे यापुढें सोडुनी हरिपद नमिं आतां
परोपकृति तव जाणिल ऐसा कोण असे जगतीं
कृतघ्न सर्वहि, प्रभु एकच परि करिं त्याला प्रणती
शरणागत जैं सुमना बघतां संतत करिं धरिलें
शिरिं कंठीं वाहिलें प्रभूनें धन्य तया केलें.

---

# सहजसौंदर्य

[ चाल—चंद्रकांत...... ]

सहज मनोहर सौंदर्याला नटवेषण नलगे
प्रिय भगिनींनो ! नच दिसतें का सृष्टि कशी वागे ?
सलिलपूर्ण जैं विमल सरोवर तइं कमलें फुलती
युगें किती जरि उलटुनि गेलीं तीच रंग-कांती
तोच रंग आकृतिही तैसी भेद न मुळिं झाला
तेंच तेंच पाहतां कुणा का कंटाळा आला ?
कमलमुखींनों ! कमलावरती प्रेम जरी तुमचें
कां नच घेतां सद्गुण त्याचे सहज वागण्याचे ?
सौंदर्याला सहज वागणें शोभतसे खुलुन
कृत्रिम सुंदर वस्त्राभरणीं वाढे लवभर न

---

# सुगृहिणी

कांता ती सदनीं सुशील रमणी शोभे सुधाभाषिणी
कार्यी जी सुगुणी विनम्र वचनीं संतोष जीच्या मनीं
भर्त्यातें बघुनी सदैव नमुनी 'राखीं सुखी हा धनी'
प्रार्थी जी स्तवनीं रमेश-चरणीं सौभाग्य-आकांक्षिणी

सारी ओळखिली परिस्थिति भली कीं हीन खालावली
भार्यी ना फुगली कधीं न वदली वाक्या मृदू वेगळी
धैर्यानें सगळी विपत्ति हरिली दैवें जधीं पातली
काळाला डगली न, रक्षि पहिली कीर्ति स्वयें ती भली

कांताच्या इतरां जनांस चतुरां लेखी जशी भ्रातरां[1]
वृद्धांना पितरांसमान मधुरा बोले मुखें जी गिरा
होवो लाभ पुरा न वा जागिं खरा वाटे तियेचा नरा
पावित्र्यें अमरां गमे सुरुचिरा देवीच कीं सुंदरा

---

१ बंधूंना.

# विरहिणी.

[ चाल—जरी कुणा श्रीमंताची० ]

विरहिं मला आतां नाथा ! लोटितां कितीदां ?
केविं तुम्हांविण हो मातें क्षणहि एक सौख्यदा ?
याच रुचिरनयनकरें मी खुलत डुलत कांता !
तेंचि आड पळभर होतां—जाय सौख्य अंता !

मधुर वच श्रवणीं पडतां मोद हो मनाला
काय त्याच कानीं ऐकूं इतर कटु वचांला ?
सेव्य चरण तुमचे मजला सोडुनी तयांना—
राहणें गमेना बरवें ज्या स्थलीं तुम्ही ना !

प्रथम तुम्ही सेवुनि मग तें अन्न योग्य आम्हां
अन्नपाणि केविं तुम्हांविण प्रिय मज विश्रामा !
रात्रंदिन झुरतें ऐसी आठवुनि तुम्हांला
कां न दीनवदन दिसावी पति-विरहीं बाला ?

जाउं नका टाकुनि सदया ! नमुनि विनवितें पदा
कां न विरह जांचि तुम्हांला मजसम तिळही कदा ?

---

## तन्मयराधा

[ चाल—भूपती खरे० ]

तव चरणसरोजीं भ्रमरी मी अति लीन
तारिं गा! सदय माधवा! करीं भयहीन
मी तीच तुझ्या आवडिची आहें राधा—
लाडकी; वागवीं सतत तिला सुखकंदा!
जी तुवां बहूतापरी वर्णिली, ठेली—
ती तीच तुजपुढें; कृष्णा पाहुनि धाली

पावतां तुझ्या चरणाला—मी मुदें
याचितें दीन दासीला—सुगति दे
मी कथितें मद्दुःखाला—अभय दे

" त्वत्कृपे लाधली काया तुज अर्पीन "
हंसती जन म्हणतां 'भली भली गे!' म्हणुन
कुणि म्हणती मजला " संग न धरिं तूं त्याचा
सुरुचिर तव काया शिणविल काळा वनिंच।
तव हरिणापरि जीं सुंदर नयनें त्यांची
गति होइल कान्ह्यापरी वांकडी साची

तव अधर बिंब ते कपोल जैसीं सुमनें
फिरफिरुनी मागें सुकतिल उष्णें पवनें

मुरलीच्या मंजुळ नादें—मोहुनी
वेड्यापरि तुजला राधे ! फिरवुनी
सुखलेश लवहि तुज ना दे; याहुनी—
तूं ऐक आमुच्या वृद्धांचें हितवचन
फिर मागें जाऊं नको तयामागून."
हें मूढवचन ऐकतां कींव ये त्यांची
कां मती जाहली मंद वृद्ध कुजनांची
जो सखा जिवाचा त्रिभुवन-पतिही तैसा
मी त्यजिन धरुनि लोकापवाद मनिं कैसा ?
परि नवल गमे माधवा ! तुझ्या चरणाला—
पावतां निंदिती काय म्हणावें याला !

कुणि निंदा लावा दोषां—मज नसे—
ती लज्जा चाडहि आतां—नुरलिसे
श्रीकृष्ण कृष्ण मद्ध्यानीं—वसतसे

" हें खरें राधिके ! काय ?" म्हणुनि हरि बोले
" तुज वेड लागलें तसेंच मजला झालें !"

---

# कृतार्थराधा

[ चाल—वीरशिरोमणि सकल० ]

राधाः—मणिमय सुंदर रत्नखचित ज्या मुकुट दिसे साजिरा
दावि गे ! कृष्णसखा गोजिरा

कटि पीतांबर रम्य नेसुनी शोभे घनसांवळा
म्हणवि तो पवित्र नित सोंवळा

करिं मुरली धरि अधरिं वाजवी मंजुळ रव तो तिचा—
परिसतां विसर पडे तनुचा

मी धावत आलें मागें सोडुनि गृहा
अदृश्य जाहला एकाकी गे ! पहा
'वाजीव वेणु तूं' नच केलें आग्रहा

द्वारावरुनी लपुनी जातां म्हणतो 'इकडे जरा—
येइं गे ! राधे !! करुनी त्वरा'

टाकुनि सारीं गृहकृत्यें मी धावत आलें परी
दिसेना शोध करूं कुठवरी

वेड्यापरि मी इकडे तिकडे फिरतें, बघतां कुणी—
म्हणति मज 'काय हरपलें वनीं'

शुकसनकादिक योग्यांना जो गवसेना श्रीहरि
मज कसा दिसेल मग लवकरी

परतुनियां जावें वाटतसे मन्मनीं
हरि ! काय वाटली क्षुद्र अशी कामिनी
परि न फसें आतां गांठ बांधिं तूं मनीं

ही बघ निघतें ऐसी जाया म्हणतां-धरिलें करा
म्हणे हरि 'राग दिसेना खरा'

**कृष्णः**—फिरतां फिरतां कांटे रुतले तुझिया कोमल पदीं
काढुं दे मजला गे ! ते अधीं

घर्मजलानें भिजली तव तनु प्रथम पुसूं दे मला
होय जी मजसाठीं विव्हला

केश विखुरले भालींचे तव सांवरुं का मी स्वयें
राधिके ! वद गे !! मजला सये !

मीं कष्टविलें बहुपरी न संशय मुळीं
देईन तुला परि ऐसें जें तव कुळीं
नच कधिंहि मिळालें, मिळे न कोण्या स्थलीं

कैवल्याचें धाम सुखाचें न मिळे योगीवरा
केविं नच दुर्लभ इतरां नरां ?

**राधाः**—मंगलधामा पुरविसि कामा भक्तजनांच्या सदा
विसरला ब्रीद न अपुलें कदा

त्या तूं मजला धरुनी हृदयीं सांत्वन करिसी तुला—
दिलें तरि काय कळेना मला
गरिब बापुडी अबला केवळ ठाव मागतें पदीं
सागराकडेच धावे नदी
मी कृतार्थ झालें तुझिया आश्वासनें
मानितें तसें नच आतां त्रिभुवनिं उणें
सेवीन सतत हे पाय शुद्धतर मनें
धन्य धन्य मज्जन्म जाहला कृपे तुझ्या श्रीधरा!
राधाकृष्ण म्हणवितां खरा

---

## कवीस—

कशास कविता हवी कविवरा ! तुझी संप्रती ?
अचेतन शवास जी न नव जीवना देइ ती
मृतापरि जगीं जिणें जरि न जाइ तें भालिंचें
न मोल कवडीहुनी अधिक ये तुझ्या वाणिच्चें !
समर्थ मुळिं ना गिरा जरि गमे तुझी वा ! तुला
कसा सुखद दाविशी पथ जनां तरी तूं भला
जलाशयिं न राहिलें जल जरी स्वयें शुष्क तो
कुठूनि तरि पात्रिं ये बुडवितां वृथा शीण तो

---

## कवीस—

रसभरित अशीं कवनें गा !
कविराया ! नच राहिं उगा
स्वदेशभक्ति न ज्या मार्जी—न करीं कविता तूं आजी
स्वदेश दारिद्र्यें शिणला
दीन वदन दावी सकलां
तरि ज्या मार्गें दीनपणा—जाइ लया तो कथिं दीना
युवयुवतींच्या प्रेमाचीं—
सुंदर गाणीं गायाचीं—
संधि असे का कविराया !—मुळीं न दवडीं ही वायां
त्या जागीं तूं उपदेशीं
सूत काढणें प्रतिदिवशीं
निज भगिनींना या कालीं—मिळवाया संपत गेली
आकाशींच्या चंद्राला—
गाउनि मिळतें काय तुला ?
दूरदृष्टि तुज जरी म्हणूं—स्थिति येथिल नच कळत अणू
गुंजारव तो भ्रमरांचा
वर्णुनि शिणवुं नको वाचा
गुंगुं नको त्या नादानें—जागृत करिं जग तव गानें

स्थिति अति बिकट कशी न कळे
परक्यांनीं नेलें सगळें
डोळेझांक कराल किती—करितिल ना अपुली माती
मातीमोल जिणें अपुलें
व्हावें, गमतें काय भलें ?
न तरी जिवंतपण हें का ?—दुःखें मारी जन हांका
जाणुनि त्यांच्या दुःखातें
सांगा उपाय तुम्हि त्यांतें
न तरी कर्तव्या चुकलां—कविरायांनो ! या कालां

---

# कवींस विनंती

[ चाल—जरि वरुनि धु ट सोंवळा ]

तुम्हि लिहा सुकविता अशी विविधशा रसीं हृदयें आकर्षुनि घे तशी—
सहज जी रुचे रसिकमानसीं
जी बघतां हृदयें मुदें डुलुनि जन वदे कविस या " प्रसन्न तूं शारदे !
म्हणुनिच रचितो सुंदर पदें "
नवकवनमाळ गुंफुनी सतत जो कुणी पूजितो शारदेस वंदुनी
कवी हो तिच्या कंठिंचा मणी
निज—अंकिं घेउनी तया पाजिते पया सुदृढ सर्वांगें व्हावया
शारदा माता सद्गुणमया
कवि दुर्लभ जगिं यापरी यशःश्री वरी जयाला धन्य करी भूवरी
तयाची म्हणवी नवरी खरी
निज पतीस सुखवावया कर जुळूनियां फिरते निशिदिनिं मागें तया—
राखिते प्रसन्न मधु वदुनियां
ज्या प्रासादीं उपवनीं पर्वतीं जनीं करि तो विहार त्यामागुनी
धावते ती सति दिनयामिनीं
अशि लाभे सहचारिणी जरि, न का गणी निर्मिल नवें कीं मनीं
कवनीं काव्य सतीचा धनी
हें विश्व नवें निर्मुनी कवींनो ! कुणी दाखवा, प्रथम तया वंदुनी
करिन त्या विहार काव्यांतुनी

---

# रसिकांस--

कुसुमनवविकासें मानसें सज्जनांचीं
प्रमुदित अति होतीं पाहुनी श्री सुमाची
मधुर मधु तयाचा सेवुनी गंध तेवीं
भ्रमरसम रसज्ञ प्राज्ञ होती न केवीं ?

अभिनव कलिकांच्या घालुनी कंठिं माला
करिति अलि सुवेषें नृत्य गुंजारवाला
विहरति वनिं पंक्ती मोहिती सन्मतीला
लवहि रुचि तयाची येइ का ती दुज्याला ?

बहर तरुलतांना प्राप्त होतां वसंतीं
जमति विहग गाती सुस्वरें कोकिला ती
श्रवणमधुरनादें ज्या वनीं तुष्ट होती
उपवन रसिकां दे दिव्य आमोद चित्तीं

रुचिर नव फलांचा स्वाद आस्वादितांना
द्विजगण समभावें सेविती तद्रसांना
मुळिंहि न कलहातें पावती एकमेकीं
कशि न सुखद हो ती सेव्य जी रीत लोकीं ?

बहु तरुवर शाखीं बांधिती एकमेकां
विनत तरुस जोमें आश्रया देति जे कां
पतन मुळिं न त्याचें पाहवें त्या तरूंना
जगतिं विषमरीती मानवीं शोभते ना

रसिक रसिक कोणी गाजती जे अमूप
कळुनि वळुनि केवीं झांकिती सौख्यरूप
स्थिरचर जगतीं जो दिव्य आनंद नांदे
विशद करुनि लोकीं त्यांस द्यावा सुशब्दें.

---

# संसारांतील विषमता

“ नयें सतत वागती प्रभु तयांस संरक्षितो
प्रसंग पडतां महा कठिण ते कृपे टाळितो ”
असें विबुध वर्णिती परि तया कसें ना दिसे
जगीं अनयवर्तनी जन किती सुखानें वसे ?

तदा नय बरा तरी अनय कीं बरा मी म्हणूं ?
नयीं अमित संकटें अनयिं सौख्य का मी गणूं ?
सुखा सकल इच्छिती, नच कधींहि दुःखा कुणी
परी अनय सेवुंनी स्वसुख तुच्छ तें मी गणीं

किती गरिब नाडुनी भुलवुनी तयापासुनी
कितीक कपटी पहा उकळिती धना, दावुनी—
हितार्थ लटकें तसा कळवळा फुका दांभिक
जसा नयन झांकुनी सहज डाव साधे बक !

जणूं धवल वस्त्र तें हृदय कृष्ण झांकावया
तशी नयनिं आरशी लपवि काकदृष्टी, तया
भुले बरिबरी बघे, परि न अंतरींच्या खुणा
सुजाण परमेश्वराविण कळे न भोळ्या जनां

परिस्थिति विलोकुनी जगिं गमे अती खिन्नता
कसा फलद होतसे प्रभु अशास ! कां अंधता—
धरी सुजन-रक्षणीं ! बघुनि अंत त्यांचा पुरा
छळी, तरि न मी म्हणें प्रभुस योग्यमार्गीं खरा

असंख्य जन संकटीं बघुनि खेद वाटे जयां
" स्वदेश, मम बंधु हे, भगिनि दीन झाल्या, तयां—
न मी समयिं सांवरूं, करुनि हाय ! जाती लया "
असें मनिं विचारिती विरल जागती जे नया
जनांस बघतां भुके कवळ ना गिळे, ते किती
वदा सुजन दाखवा करुनियां तयांची मिती
परी उदरपोषणीं निजहितार्थि जे दुर्मती
अशा उभयतांमधीं मिळवि कोण हो ! सद्गती ?
कुणावरि कसा धरूं भरंवसा ? न जाणें कुणी
जणूं बुडवि हा मला, समयिं तारि तो धावुनी
दिसे जरि वरी भला परि न तो तसा, याहुनी—
पहा प्रथम प्रत्ययीं उतरतां म्हणा सद्गुणी
जरी कुटिल भूषणें नटविती स्वयें आपणा
धनी म्हणवुनी जनां फसविती, स्वतांच्या गुणा
स्वयें वदुनि गौरवें मिरविती अहंता वृथा
क्षणीं विफल वल्गना करि मिळे अशां जाणता
प्रभू नच म्हणे कदा अनयिं सौख्य व्हावें जगीं
नयी परि सदा असो अढळ दिव्य ऐशा नगीं
तदा सकल आयका प्रभुचिया रवा, देउनी—
सदा श्रवण, ना तरी कुणि न तारि त्यावांचुनी

## सुपुत्र आवडती सर्वां

शिशुचें अंतःकरण जसें
शुभ्र पटाच्या परी दिसे
रंगें कोण्याही नटवा
खुले तोच मग रंग नवा

कृष्ण शुभ्र वा
वाइट बरवा
मिश्रण करवा

वाटे जैसा रंग हवा
सुखविल तो तुमच्या जीवा
चित्रकार परि कुशल जसा
रंगवील तो चित्र तसा
बालकहृत्पट रंगविती
प्रथम पितामाता जगतीं

ते ज्या रीती
सतत वागती
त्या अनुसरती

बालक सत्पथ मानुनियां
" इतर सर्व पथ टाकुनियां

चतुर सद्गुणी सुंदरसा
सुपुत्र दे मजला ईशा !"
यापरि इच्छिति सर्व जरी
कुपुत्र कां निपजती परी

हेळसांड अति
पितराहस्तीं-
होते, वरतीं-

शिक्षकही तैसे मिळती
म्हणुनि मुलें वायां जाती
यास्तव कर्तव्या उमजा
बालक म्हणजे नव्हे मजा
रात्रंदिन त्या जपा अती
तरि पुढतीं कामा येती

सन्मार्गाचें
वळण तयाचें
देउनि त्यांचें-

अंतर सुंदरसें सजवा
सुपुत्र आवडती सर्वां

---

# शिशु-हास्य

(आईनें मांडीवर घेतलेल्या वर्षा दीड वर्षांच्या हंसऱ्या बालकाचें भिंतीवर टांगलेल्या त्याच्या आईबापांच्या फोटोकडे लक्ष जाऊनच कीं काय तें बालक जास्त जास्तच हंसूं लागलें, तें पाहून आई त्यास हंसण्याचें कारण विचारते.)

बालक हंसतां—आनंदित झाली माता ॥
कुरवाळुनि ती त्यातें पुसते—
" कां या वदनीं हास्य विलसतें
वदाशिल कारण का मजला तें "
हलवी माथा—मातेसी " ना ना " म्हणतां !

" अजुनी पूर्ण न दो वर्षांचा
आली बाळा ! तुजसि न वाचा
परि संकेतें तव मानसिंचा—
हेतू कथितां—जाणीन तरिच मी माता " !

तैं तें बालक दावी हस्तें
अपुल्या चित्रित मातृपित्यातें
" हीहि तूंचि का " जणुं कीं पुसतें
" बघुनी ताता—हंसलीस सांग कां आतां " !

" म्हणुनिच्च हंससी का रे ! बाळा !
न धरीं हट्ट घालिं त्या आळा
सांगूं कवण्या शब्दें तुजला
तिकडे बघतां–नावरे हास्य आवरितां !

जैसें तव मुख चुंबुनि मातें
हृदयीं प्रेमा येई भरतें
तैसें घालुनि कर कंठातें–
विळखा देतां–जाणिलें तिकडच्या चित्ता !

तरि मी वदलें सोडा मजला
अधरीं काय सांठलें बोला
नाहीं आयकिलें वचनाला
दूर किं सरतां–अधरगती ना ये वदतां !

किति रे ! धूर्त शिशुपणीं बाळा !
बहुविध चित्रांतुनि तव डोळा–
गेला कैसा तिकडे, मजला–
" न कळे " म्हणतां–खुदखुद तिज हंसला बघतां !

---

[illegible]

# " तें प्रेम कोणीकडे !"

मातेच्या हृदयीं विशुद्ध वसतें  तें प्रेम कोणीकडे
त्या प्रेमा न सरी; उरीं धरुनियां बाळास घेई कडे
वाढे मोद समावतो न गगनीं  घेई मुके जेधवां
स्वर्गीचें सुख वाटतें अनुभवी प्रत्यक्ष ती तेधवां

रांगे अर्भक अंगणीं स्वनयनें लीला तयाची बघे
होतां तो लव दृष्टिआड उचली मांडीवरी त्यास घे
स्वच्छंदें विहरावया न मिळतां उच्च स्वरें तो रडे
ती घाली स्तन तन्मुखीं न गिळि तो बिंदूहि, ऐसा अडे

ऐकेना छकुला तदा हुडकुनी आणोनि दे खेळणीं—
बाजा चेंडु तसा नवा खुळखुळा हातीं तया देउनी—
बोले " वाजविं नाद मंजुळ तुझ्या हस्तें मुखें ऐकवीं
झाले आतुर गावयास कवनीं सत्काव्यकर्ते कवी "

नाहीं बालपणा तशीच जननी मातें न आतां दिसे !
गेली ती सुख तें समूळ विलया साहूं वियोगा कसें !



# एक शिक्षक

तो एक शिक्षक जसा गमला मुलांना
वैरी अनेक पिढिंचा छळितां तयांना
शाळेकडे न वळतो मुळिं पाय त्यांचा—
जांचामुळें; निजमुखें वदवें न वाचा !

---

# विमलेची चिरनिद्रा

आई ! हा बघ भांडतो मजसवें दादा सदा गे ! असा
" नाहीं कांहिं तुझें तसेंच घर हें माझें " वदे फारसा
" झाली थोर किती तुला कुठवरी द्यावें बये ! खावया "
सोसेना असलें कठोर वच हें याचें मला या वया !

माते ! ज्या घरिं जन्मलें तशिच मी झालें वयें एवढी
सत्ता नाहिं मुळीं; मला समजलें ! झालीस तूं वांकडी !
बाबाही बसती उगे, न भरती रागें तया एवढें
वाटेना घर हें बरें निशिदिनीं खाणें न जाई, अडे !

बाळे ! सांवरुं मी तुला कुठवरी झालों अम्ही बावळे
दुर्दैवें छळितां कुणी न कर दे ! ये प्रत्यया चांगलें
" हुंडा पांच हजार द्या " वदति गे ! जातां तुला द्यावया
आणूं कोठुनि ? केंसही न इतुके डोईवरी माझिया !
'राहूं देइ न बंधु या गृहिं तसें आई न दावी दुजें
देवा ! दाविं तुझेंचि धाम', विमला बोलूनि ऐसें निजे !

---

# खरी विश्रांति

कष्टोनी ललना करी पति-गृहीं कामें दिनीं यामिनीं
कोपे सासु जरी न राग धरि ती; संतोष मानी मनीं;
साही सर्वहि बोल हाल अवघे; मागें न ती फारसे
नाथाचे तिज शब्द दोन पुरती विश्रांतिला गोडसे !

---

## " चिरसौख्या विलंब कुठला ? "

जमवा मेळा । विसरुनी स्वपरभावाला

ना माना नीच कुणाला
नच गणा श्रेष्ठ अपणाला
श्रेष्ठता नसे वर्णाला
परी तत्कृतिला । पाहि जो स्वतांसम सकलां !

घन वर्षे सर्वांठायीं
उपवन–वन–पर्वत–राई
भिन्नत्व तयां हें नाहीं
दावी सकलां । टाकाया भिन्नत्वाला !

कोकिळ मंजुळ रव करिती
ना केवळ रसिकां बघती
मधुरवें सुगीतें गाती
दावुनि सकलां । कथिती "त्यजिं मत्सर-जाला !"

वृक्षतरूस जो कवटाळी
बांधुनियां शाखा–जाळीं
लतिका प्रेमें कुरवाळी
त्या वृक्षाला । कीं द्वैतभाव त्या नुरला !

गोपीजन गोपालहि ते
वृंदावनिं खेळत होतें
स्वानंद लाभला त्यांतें
त्या समयाला। अनुभविलें स्वानंदाला !

स्वानंद तुम्हां जरि व्हावा
सकलांहि मिळुनी घ्यावा
सहकार सुकार्यीं लावा
देशोन्नतिला। तुम्ही अमोलशा नरतनुला !

शशिकर नित अति सुखदाते
विश्वा नवजीवन देते
पसरले स्थिरचरांभवंते
कथिती सकलां। 'सारा अज्ञान-तमाला !'

अज्ञान-तमा जाळीलें
पाजळुनी ज्ञान-मशाले
जन विरोध विसरुनि गेले
सजला मेळा। चिरसौख्या विलंब कुठला ?

---

# सन्मित्र-सुमन

( चाल-भूपती खरें ते...... )

मच्चित-मधुप या विश्वोपवनीं भटके
सन्मित्रसुमनिं चाखाया मधुचे घुटके
परि नाढळती निशिदिनीं हिंडतां वाटे
तीं सुमनें सगळीं लपलीं कुंजीं वाटे
हा वेडा मधुकर रस सेवी भलभलते
कळलें न तयाला गरल बरें यापरतें
तें गरल मांत्रिका हातीं–त्या प्रती
औषधेंहि नाना असती–नच मिती
भय उपजे मधुपा 'दुष्ट गरल जें विटकें
का तेंच संचलें उपवन--कुसुमीं कुजकें !'
फूत्कार विषारी जातिल विलया सारे
परि सखया ! मधुपा ! दुर्जनविष अनिवारें
जीं बिलसति कुसुमें सुंदर वरिवरि बघुनी
तूं भुलसि तयांच्या मागेंमागें फिरुनी
मधुविहीन सुंदरताही–जाण रे !
दुर्गंधपूर्ण कुसुमें हीं–जाण रे !
मधुपूर्ण सुमन तुज न मिळे, तरि तूं शोकें
स्वीकरीं विजन काननीं वास अति दुःखें !

किति अमित वाटिकीं प्रासादीं शोधियलें
कृत्रिमशा रंगें नटले मानें तठले
फिरफिरुनी मागें कांटे अगणित रुतले
त्या सुमछंदें तूं कष्ट बहुत सेवियले
    सोडिं तूं अशांच्या नादा—आपदा—
    घडवितील, संग न सुखदा—हो कदा
ना मधुही गवसे परिमल तोहि न पदकें—
लाथाडिं तयांना चिरडुनि न गणीं लटकें !
ज्या सुमनिं दरवळे सुगंध तें वन कोठें ?
मधुकरा ! तुला का श्रम केल्याविण भेटे ?
कुणि खूण सांगती सुंदरशा सुमनांची
कीं विपत्कर्दमीं निर्मी प्रभु सुगुणांची
    जाइं रे ! अशा त्या ठाया—भ्रमुनियां
    चिरवास खास सेवाया—मिळुनियां
होशील धन्य तूं मानुनि तें सुख लटकें
ज्या सुख सुख म्हणती इतरे जन निःशंकें !

---

# सुपथ-संदेश

सुखाची गा! इच्छा हृदयिं वसते दुःखित नरा!
तरी ना अव्हेरीं सजिवपणिं तूं उद्यम जरा
न जीवित्वा साजे क्षण दवडणें आळसपणें
सुखें निद्रा घ्यावी कशि तरि तुवां या अवगुणें?
धरीं उद्योगाची निशिदिनिं सख्या! कांस अचळ
तदा त्वद्भाग्याची घडि सहज होईल धवल
धनानें मानानें जगतिं तुज ये मान्यपण तें
कधीं होई प्राप्त श्रमित तनु केल्याविण न तें!
स्वयें शोधोनीयां प्रथम करि संकल्प बरवा
सुसंकल्पामाजीं प्रभु सतत दावी पथ नवा
क्रमावा धैर्यानें, सुयश नित लाभे प्रभु-कृपें
तदा दुर्भाग्याचा टळुनि दिन तो दुःख हरपे!

---

## " उद्यमें भाग्य ये हाता "

तरुण हो ! दीन कां दिसतां उद्यमें भाग्य ये हाता
निद्रेला घाला आळा जागवा निद्रितां सकलां
सर्वस्वीं नागविलेले नच पुरें अजुनि कां झालें ?
वेळीं नच सावध झालां त्यायोगें निर्धन बनलां !

दारिद्र्य मरण यांतूनी—
मरण बरें गणिती ज्ञानी,
तें दुःख अल्पसें मरणीं,

परि नको नको निर्धनता ! उद्यमें भाग्य ये हाता !
नच तरणोपाय तुम्हांला उद्यमावीण लव उरला
सत्तेचीं निजवस्त्रें तीं घालविलीं अपुल्या हातें
झिरमिरीत हल्कीं लेतां झांकिती न वपु जीं पुरतें
वाऱ्यानें भरभर उडती आवरति न युवयुवतींतें

ही वाऱ्यावरची मोट
लाभली कुणा का नीट ?
येउं द्या तियेचा वीट

व्हा धीट तरुणहो ! आतां–उद्यमें भाग्य ये हाता !
भाळावें भलत्या वेषा तत्क्षणीं सजावें नाशा
नाजूक हट्ट पुरवाया बळि पडणें योग्य न आतां
हे वेडेचार पुरेसे अजुनी नच झाले कैसे ?
यापायीं ऐसें घडलें कीं दास्यें राष्ट्रचि गिळिलें !

आतां तरि सावध व्हावें
वेडेपण टाकुनि द्यावें,
गतवैभव संपादावें,

वाटतें साच जरि चित्ता–उद्यमें भाग्य ये हाता !

---

## “ वानीन त्याच आर्या ”

या दीन भारतासी
    गत–वैभवास देई
सत्पुत्र कोण ऐसा
    जन्मास वीर येई ?
लाभेल आज कैसें
    गत–विभव आपणातें
करिती विचार नेते
    कां व्यर्थ होति ते ते ?
नेता असा न साजे
    जाणे न योग्य मार्गा
हित कोणतें कळेना
    वेळींच त्यास त्यागा !
भुलुनी स्वगौरवातें
    बुडवील आपणाला
मार्गे तया न जाणें
    हें योग्य शाहण्याला
दुसऱ्यास तुच्छ गणुनी
    मानी स्वतां शहाणा

ऐशा गुणें कधीं का
   श्रेष्ठत्व येइ कोणा ?

या भारतास जडला
   हा रोग रोमरोमीं

असहिष्णुता न बरवी
   जो तो करीत 'मी मी'

हा मीपणा त्यजूनी
   वाहील देश–कार्या

सनुमानसाधनातें
   बानीन त्याच आर्या !

---



## क्षत्रियास—

सत्तेज क्षत्रियांचें कां सारेंच लयाला गेलें ?
नांवाचे क्षत्रिय उरले सामर्थ्य तयांतिल सरलें
तत्भुजबल तें जाउनियां सर्वस्वीं हतबल बनले
तो प्रताप लवहि दिसेना मुळिं धैर्य कसें तें नुरलें

विपरीत दशा ही आली
केवीं न कळे या कालीं
कां दैवगतीही फिरली

कां क्षात्रवृत्ति अंतरली—विपरीत कसें हें घडलें ?
क्षत्रियां रुचे तरि केवीं निज—देश संकटीं पडतां
निजमाय बंधु-भगिनींचे पहावें हाल का होतां ?
अन्नान्न दशा कां यावी ? जरि क्षत्रिय तुम्हि म्हणवीतां
मारितां लाथ त्या जागीं पाणी न कसें ये आतां ?

ही परंपरा दुःखांची
तोंवरीच चालायाची
जोंवरी दृष्टि नच तुमची—

उघडली न वळली इकडे—दुर्भाग्य न तुमचें सरलें !

---

# वकील

( चाल—वीरशिरोमणि सकल......)

प्रतिष्ठितपणें मिरवायातें मिळेल धंदा असा
वकीलीविण न दुजा योग्यसा

जगीं सांठल्या अवघ्या जेणें ज्ञानाचा लाभ हो
असा हा नामी धंदा अहो !

प्रयत्न नलगे नेतेपण तें आपोआपच मिळे
पाठिशीं जनसमुदायहि वळे !

अंध बिचारे विश्वासानें देति गळे त्या करीं
परी हा वकील फिरवी सुरी !

रावाचा रंक बनवितो रंकहि रावापरी
असा हा रावा बडबड करी !

किती आजवरि धुळीं मिळाले याच्या पायीं तरी
देति जन शिव्याशाप अंतरीं !

चाड न सत्यासत्याची त्या पापपुण्यही तसें-
गणी नच, निर्भिड म्हणवीतसे !

निर्भिडपण तें जाई कळसा दूत यमाचा जसा।
गळीं गळफांस लावितो तसा !

बंधुप्रेमामधीं कालवी खरविष मधु बोलुनी
स्वार्थ का साधे याबांचुनी ?

पतिपत्नींच्या कलहीं पटवी वाक्पटुता ती किती
सोडवी पति-पाशांतुनि सती !

आईबापांतुनी वेगळा सत्पुत्रातें करी
थोरवी वदुं याची कितितरी ?

दोषनिदर्शन करूं कोठवरि पुरें फाटलें जिथें
ठिगळ तरि लावावें किति तिथें ?

वगळुनि अपवादभूत तैसे विद्यमान थोडके
थोर जे थोरपणाचे भुके

जनहितसाधनिं तत्पर अंतर सत्सेवा लाभ हा
गणिति ते थोर महात्मे पहा

कर्तव्याचा टिळक लावुनी दास मायभूमिचे—
गाजले वकील ते आमुचे !

## रंगभूमीचें स्वयंवर !

[ चाल–चंद्रकांत...... ]

नटवर गंधर्वांची कुशला नाट्यकला बघुनी
हर्षित जनमन; उत्सुक दिसती रसिकहि गुण-ध्यानीं
कुणी वानिती तत्सौंदर्या अभिनय कुणि वानी
गान तानयुत सुमधुर ऐकुनि लागति तध्यानीं
पुराणकाळीं रुक्मिणि कैसी श्रीकृष्णें हरिली
कैसी रुक्मिणि तन्मय बनली वरण्या वनमाळी
धिक्कारुनि शिशुपाला तैशा इतरां नरपाला
सजला रुक्मी द्याया परि ती मानि झाडपाला
ऐसी दैवीतेजें नटली रुक्मिणि, अवलोका–
गंधर्वाच्या हृदिं संचरते; गणा न अतिरेका
" चंद्या ! देइन तुज सुंदर गृह, सोन्याचें तुजला–
स्नेहलते ! गे ! देइन " म्हणतां नवल गमे तिजला
बहुमोलाचीं गृहें देउनी वसशिल तूं कोठें ?
'करिन यदुमनीं सदना' बोले 'मन्मन तयिं न विटे'
कुशल कृष्ण कवि सजवी ऐसें पुराण रुक्मिणिका
नट न योग्य गंधर्वाविण कुणि रंगवील तिजला

स्पर्धा करिती इतर नट परी साधे नच त्यांना
आणा लव तरि गुण त्यांतिल निज अंगीं; द्या ध्याना
पात्राशीं तन्मयता होणें सहज न इतरांना
रुक्मिणि म्हणतां रुक्मिणि बनुनी विसरे तनुभाना
भीमकतनया केवळ गमते खरी खुरी रसिकां
कां न रसिक मग त्या वाखाणी, त्यजुनी आणिकां !
नाट्यकला श्रीकृष्णा[1] घाली माला बहुमोला
रंगभूमिनें वरिलें त्यापरि या गंधर्वाला[3]

---

१ कृष्णाजीपंत खाडीलकर. २ नाट्यकला कवि कृष्णा माळा घाली. ३ बालगंधर्व.

## त्याच्या न सौख्या सरी !

पांथाला रविच्या प्रचंड किरणें रानीं न थारा मिळे
वारा ही अनलासमान छाळितो, टाकी पदातें बळें
पाही भोंवति वृक्ष एकहि नसे श्रांता तदा त्या जरी
रम्योद्यान मिळे, सुशीत जलही, त्याच्या न सौख्या सरी !

---

## कालाय तस्मै नमः

कुणीं सांगावें काल कसा येई
सुखवि एका कां दुःख दुज्या देई
गती कालाची कळत ती कुणा ना
थोर केले जरि पहा यत्न नाना

कार्य करितां अविरत न शांति ज्यास
नाहिं दिवसहि तैशीच रात्र त्यास—
एक ठावें निजमार्ग आक्रमावा
नवा अनुभव नित सकल जगा द्यावा

जगा वाली तूं खरा एक काला!
तुला झालें वश सकल, तूं न त्याला
अतुल बल तव हें पाहुनी, तयाचें
नियंत्रण नच कुणि करूं सजे साचें

क्षणीं फिरतां तव दृष्टि वृष्टि व्हावी
अमित दुःखांची, सुखें लया जावीं
जरी हळहळुनी प्रार्थिलें तुला गा!
तरि न येई कळवळा त्यजुनि रागा

दया माया लव येइना कशी ती
निष्ठुरा कां तूं वरिसि अशी रीती
प्रथम वंदन तुज म्हणुनि करिति थोर
असो काला! माझाहि नमस्कार

---

# टिळक–गुण–स्मरण

सुपुत्र म्हणवोनियां भरतभूमिचा गाजला
कुपूत शत ते नको परि असो असा एकला
असें सकल इच्छिती परि न तो पुढें लाभला
दिसेल कधिं का कुणा फिरुनि तो तसा आजला !

जयें अमित साहुनी श्रम सुखाप्रति त्यागिलें
शरीर मन अर्थही जन-हितार्थ तें अर्पिलें
असा सतत वागला न निजला, इमानी अशा–
कसें विसरुं भोगिल्या अमित हाय ! नाना दशा !

जसा अढळ निश्चयी ध्रुव तसाचि वाखाणिला
'स्वराज्य मम हिंदभूस मिळवीन मी' बोलला
भया न गणिलें जरी अमित संकटीं नाडला
दुजा ध्रुवचि हा जणूं अढळ बाळ कीं बैसला !

'रहस्य' कथिलें जना त्वरित कर्मयोगी बना
त्यजा स्वपर भावना विसरुनी जुन्या कल्पना
वदा न बहुतापरी कृति करा करा, त्याविना
कशी सुगति लाभणें करुनियां फुका वल्गना ?

तया अनुसरोनियां विमल राजमार्गा क्रमा
सदा स्मरण अंतरीं दृढ धरा तरी हो तुम्हां
सहाय्य बलवंत तो टिळक, यापरी स्मारका–
करा सविनयें जनां विनविं मी न मानाल का ?

---

## केशवसुतस्मरण

जनांस रमवी असें कमल निर्मि धाता कुठें ?
तयास नच अन्य का स्थल दिसे, धरा का अटे ?
चमत्कृति घरी दिसे सृजनिं त्याचिया आघणा
तयीं कुजट कर्दमीं उपजणें विधीच्या मना !

प्रभूस प्रिय जें सदा म्हणुनि बागवी तो करीं
वसे मधु सुगंधही भ्रमर सेवि ज्याभीतरीं
सुवैभव—नगीं चढे प्रभु—करामधें जें वसे
बघे कुणि न जाहलें जननकर्दमीं तें असें !

दारिद्र्य-पंकिं जरि जन्म घडे कवीचा
काव्यास मोल न उणें कधिं ये, तयाचा
काव्य-प्रवाह बघुनी नवजीवनाचा
वर्णूनि केशवसुता थकतेच वाचा !

" तुतारी "च्या नादें खडबडुनि जागे जन करी
जुनें तें ना सोनें सकल, उमजा कांहिं न तरी
सदा ती रूढी हो ! खरतर तुम्हां भेदिल हृदीं
तुतारी गर्जोनी कळवळुनियां सांगत सुधी !

" झपुर्झा " आनंदें तनुमनधनानें विसरवी
न काव्यीं वर्णाया सुगम इतरां, तत्सम कवी
कथी, चित्सौख्यीं जो अनुभवित आनंद पुरता
म्हणोनी वाखाणी स्मरुनि कवनीं केशवसुता.

गोविंदाग्रज मानी काव्य-गुरू अनुसरोनि तन्मार्गा
गेले तत्सेवानिं ते विसरुं न आम्ही अशा महाभागा.

---

# केशवसुतांस—

[ पाळण्याच्या चालीवर ]

केशवसुत गेले परि गमले तद्गुण हृदयीं ठसले
स्मृति त्यांची होई पुण्याई पुण्यतिथीला गाई
कविजन आनंदें स्वच्छंदें तृप्त होतिं परि न हृदें
केशवसुत असतां "का दिसतो दुर्मुखलेला बसतो"
पंतोजी वदले तें भरलें कोणें अंतर केलें—
मुक्ताचि त्या कालीं "या भालीं काव्यकला ती लिहिली
पाहुनि तुम्हि नाहीं तरि होई सुखि, तुमचा सुत पाहीं"
तैसें कुणि वदले—"हें न भलें कवन अम्हां नच रुचलें
कविता अशी करा तशी करा" वाद जाइ जैं निकरा
"कविता आणि कवी" ती शिकवी कवि-लीला जी बरवी
"आम्ही देवाचे मायेचे विश्व तसें हें अमुचें
विहरूं चहूंकडे गिरीकडे उपवनिं वाटे तिकडे
ऐसी स्पष्टोक्ती वानुं किती दिधली सर्वां छाती
'सतारिचे बोल' बिनमोल ठसतिल अंतरिं खोल
ध्वनि त्याचे उठती हो स्फूर्ती मनिं, कवना ये भरती
आठवितों म्हणुनी मत्कवनीं तव गुण शिरिं वंदूनी
देईं कविराया ! तव शिष्या प्रतिभा कवनें गाया
निर्मिन विश्व नवें जसें हवें सौख्यद मातें बरवें !

---

# वेणु-नाद

[ चाल—चंद्रकांत ]

कोण वेणु बाजवी ? सुचेना कांहिंच नादानें
काळ वेळ मुळिं नाहिंच कैसा बाई ! तो जाणे !
सांज सकाळ न पाही तैसा दोप्रहरीं नाहीं
ध्यास दुजा निशिदिनीं एक त्या लागुनिया राही
मलाच कैसा अखंडध्वनी ऐकाया येई ?
रात्रीं निजल्या शयनींही मज सोडि न गे ! बाई ! !
उठुनि सकाळीं काम न धंदा सुचे मला कांहीं
त्यायोगें मज सासूबाई लाखोली वाही
घरांत अप्रिय झालें सर्वां मी, न परी येई
दया कशी त्या हृदया माझें चित्त हरुनि नेई
वेडपानें मज वेड लाविलें बनलें मी वेडी
वेडपणापायीं कुणिं घालावी शिक्षेस्तव बेडी
झालें अप्रिय, बनलें वेडी, पुरी तरी बाई
वेडा माझा तोच जीव कीं प्राण मला होई
वेणु-नाद ऐकुनिया घालें चित्त, शांत वृत्ति
होई, हृदयीं भरली माझ्या मुरलीधर-मूर्ति

---

# माता आणि कविता

बालपणांताचि तूं मातें !
टाकुनिया तव पुत्रातें–
गेलिस, परि नच जगताचें
ज्ञान दिलें तुजजवळींचें
त्या योगानें
अज्ञपणानें
कांहिंच नेणें

दिवस कसेतरि ढकलितसें
माझें मजला येइ हसें !
अफाट या जगतीं कोणी
हितानहित तुजवांचोनी
दाविल नच तव दृष्टीनें
भरलें जग तुजवीण उणें
इथें नांदती
मती दुर्मति
उभयहि वरिती

कठोर रीती उपदेशीं
शिकवण ना माते ऐसी

माते ! वियोग तव घडतां
कवितादेवी पावनता—
वितरी मातृ-विहीनाला
तव आठव नच होउं दिला

तुझी तियेची
मूर्ती एकचि
किति नवलाची

व्यक्ताव्यक्ताविण कांहीं
रूपीं अंतर नच उभयीं
प्रेमळ मातृमुखीं बसती
जीं मधु-वचनें कवनीं तीं
तींच सेवुनी राहिन मी
कविता-माता पूजिन मी

नव नव सुमनें
भावभक्तिनें
कवनीं स्तवनें

गाउनि वाहिन मी माला
माता कवितादेवीला

---

